# बुद्धिबलक्रीडा.



## ( बुद्धिबलाच्या खेळाचा ग्रंथ )

हा ग्रंथ

**विनायक राजाराम टोपे,**

यांणीं तयार केला

**तो**

पुणें येथें "जगद्धितेच्छु" छापखान्यांत छापविला.



सन १८९३.

**आवृत्ति १ ली.**

**किंमत २ रुपये.**

## राजमान्य राजश्री गोविंद महादेव गद्रे.
## वकील कोर्ट पुणें

यांस

त्यांचें बुद्धिबळाचें मार्मिक ज्ञान व नैपुण्य, त्यांची स्वधर्मनिष्ठा
व स्वदेशभक्ति, त्यांचे औदार्य, दृढ उद्योग व
वर्तनाचा साधेपणा

इ०

**गुणांस अति लुब्ध होऊन**

**ग्रंथ कर्त्यानें**

हें पुस्तक

त्यांच्याच परवानगीनें परमादरानें अर्पण केलें असे.

**विनायक राजाराम टोपे,**

ग्रंथ कर्ता.

पुणें,
१८९३.

# प्रस्तावना.



कोणी हिंदु गृहस्थास युरोपियन गृहस्थाबरोबर बुद्धिबळें खेळण्याचा प्रसंग हमेश येई. त्या गृहस्थाचें खेळणें कमी असल्यामुळें त्यावर सगळे डाव होत; डाव झाल्यावर तो युरोपियन फार गर्वोक्तीनें बोले कीं, हिंदूचा डाव मजवर होणें नाहीं. हें बोलणें त्या हिंदु गृहस्थास सहन होऊं नये; परंतु करतो काय? सामर्थ्य नाहीं. मी बुद्धिबळें बरीं खेळतों असा लौकिक त्या हिंदु गृहस्थाचे कानावर गेला व लगेंच तो गृहस्थ मजकडे येऊन म्हणूं लागला कीं, एक वेळ मजबरोबर त्या युरोपियनाशीं बुद्धिबळें खेळण्याकरितां चला; तो फारच घमंड करतो व गर्वोक्तीनें बोलतो. हें ऐकून मी त्या गृहस्थाबरोबर त्या युरोपियनाच्या येथें बुद्धिबळें खेळण्याकरितां गेलों; युरोपियन आणि हिंदु यांच्या मध्यें खेळण्याच्या रीति निरनिराळ्या आहेत त्या मला ऐकून ठाऊक होत्या व युरोपियनाबरोबर खेळण्याचा हाच प्रथम प्रसंग आल्यामुळें कसे काय डाव होतील हें कांहीं समजेना, दैवगतीनें पहिल्या प्रसंगीं माझ्यावर एकही डाव न होतां त्यावरच सर्व डाव झाले. असे चार पांच प्रसंग झाले तरी मजवर डाव नाहीं. हें पाहून तो युरोपियन घमंड विसरून व गर्वोक्ति टाकून नम्रतेनें म्हणाला कीं तुम्हीं बुद्धिबळाच्या पुस्तकाचा चांगला अभ्यास केला. बुद्धिबळांचें पुस्तक ह्मणजे काय हें मीं त्यास विचारलें असतां तो म्हणाला कीं, बुद्धिबळें कशीं खेळावींत व तीं खेळण्याचे नियम वगैरे ज्या पुस्तकांत सांगितलें

असतात तें. हें ऐकून मीं त्यास म्हटलें कीं असें पुस्तक आमच्यांत मुळींच नाहीं व त्याचा आम्हीं अभ्यासही केला नाहीं. हें ऐकून तो म्हणाला, पुस्तक नसतां इतकें चांगलें खेळतां हें मोठें आश्चर्य आहे. तुम्ही पुस्तक तयार करा ह्मणजे तुमच्या ज्ञानाचा तुह्मांस विसर न पडतां बुद्धिबळें खेळणारांस त्याचा फारच उपयोग होईल, त्या दिवसापासून बुद्धिबळांचा ग्रंथ आपल्यांत नाहीं, तो आपण करावा असें मनांत खेळूं लागलें.

पेनशनची वेळ आली तेव्हां मी बुद्धिबळें बरीं खेळतों असें बहुतेकांस ठाऊक असल्यामुळें प्रत्येक ऑफिसापैकीं कितीएक लोक ह्मणाले कीं, आतां तुम्हास वेळ आहे तो रिकामा घालवूं नका, बुद्धिबळाचा ग्रंथ तयार करा, फार जरूरी आहे. हें ह्मणणें त्या युरोपियन गृहस्थाचे म्हणण्याला पुष्टिकरण झालें.

बुद्धिबळाचा खेळ, असें म्हणतात कीं, सुमारें दीड—दोन हजार वर्षांपूर्वीं हिंदुस्थानांत उत्पन्न झाला. परंतु तो कोणीं उत्पन्न केला, कसा केला व केव्हां केला याबद्दल कायमची माहिती मिळत नाहीं. हा खेळ या देशांत मूळारंभीं उत्पन्न झाल्यावर बहुतेक देशांत गेला. तेथें या खेळाबद्दल ग्रंथ आहेत असें ऐकण्यांत आहे. आणि या देशांत याबद्दल ग्रंथच नाहीं हें मोठें आश्चर्य आहे. आजपर्यंत नामांकित बुद्धिबळें खेळणारे पुष्कळ होऊन गेले. परंतु कोणींही या खेळाबद्दल कांहीं वर्णन मागें ठेविलें आहे असें आढळत नाहीं

या खेळाबद्दल एक दोन अगदीं लहान पुस्तकें मराठींत पहाण्यांत आलीं. तीं फारच अलिकडचीं असून कांहीं कामाचीं नाहींत. तीं वाचलीं किंवा पाहिलीं असतां बुद्धिबळें खेळणारांस बुद्धिबळाचें चांगलें

तर काय पण साधारणही ज्ञान होणार नाहीं. ज्याला पूर्वीचे बुद्धिबळें खेळण्याचें ज्ञान आहे त्याचेंही त्यांपासून समाधान होणार नाहीं.

सुमारें दोन हजार वर्षांपूर्वी हा खेळ या देशांत उत्पन्न झाला असून त्याचा ग्रंथ जरी पूर्वीपासून नाहीं तरी हजारो लोक हा खेळ खेळत आले व खेळतात. आणि त्यांस ग्रंथावांचून माहितीही चांगली होते. परंतु जशा ठिणग्या उत्पन्न होऊन नाहींशा होतात, तशाच खेळाचे वेळेस सुचलेल्या चांगल्या चांगल्या कल्पना बुद्धिबळें खेळणें झाल्यावर नाहींशा होतात. पुनः तसाच प्रसंग आला तर तीच कल्पना सुचेल कीं नाहीं हें कांहीं सांगवत नाहीं. एवढ्याकरितां सुचलेल्या चांगल्या चांगल्या कल्पना जर लिहून ठेवल्या व त्या वरच्यावर वाचीत गेल्या तर त्यापासून मोठा फायदा होणार आहे. कल्पना ह्मणजे दुसऱ्यावर संकट कसें आणावें; संकट आलें असतां त्याचें निवारण कसें करावें, चढा डाव कसा करावा, चढ्या डावांतून बचाव कसा करावा, पेंच कसे करावेत, पेंचावर तोड काय करावी, जे डाव पुष्कळ हातांनीं होणार ते थोडक्या हातांत कसे करावेत. इत्यादि.

कठिण डाव आला असतां महा प्रयासानें एकवार तो सोडवून वेळ मारून नेली पण तोच डाव पुनः करून दाखवा म्हटलें ह्मणजे ज्या रीतीनें पूर्वी सुटलेला डाव त्याच रीतीनें तो पुनः सुटेल असें सुचणार नाहीं. कांहींना कांहीं तरी चूक लागेलच. आणि भलताच प्रकार होईल.

ज्या रीतीनें डाव सुटला असेल ती रीत सुचली नाहीं तर पुष्कळ तऱ्हा करून ती रीत शोधून काढावी लागते. मग अशी शोधून काढलेली रीत पक्की ध्यानांत ठेवतात. परंतु कांहीं दिवसांनीं तरी तिचा

विसर पडणारच.एवढ्याकरितां तीं लिहून ठेवली तर फार उपयोगीं पडेल.

या देशांत जागोजाग बुद्धिबळें खेळण्याचीं ठिकाणें आहेत. तेथें बुद्धिबळें खेळण्यास शिकणारे नवीन गृहस्थ गेले तर बुद्धिबळें कशीं खेळतात याजबद्दल त्यांस कांहींच समजावयाचें नाहीं. राजा अडीच घरें टाका, राजा शहांतून काढा, काटशह येतो, इरेस घाला, नाश ह करा, शह शह होतील, शह देईल शह येईल, दुकींत मोहरा जातो, वजिरावर हत्ती येतो, उंट घोडा मारतो, खिट्टी घाला, मोहरा अगर प्यादा इरेस घाला, डाव फोडा, मारामारी करा, लालूच द्या, गलगुटावणीनें प्यादी करा. कुजी होईल असें खेळूं नका, त्या घरावर मारा ठेवा, या पट्टींत राजा येऊन काय करणार, उंटाची नळी खुली आहे, आडव्या पट्टींत हत्ती चढेल, उभ्या पट्टींत वजीर येईल, तो मोहोरा बिन जोरी आहे, यावर दोन जोर झाले, जोर करा, मात झाली, प्यादी होणार, पंचमोहोरी झाली, बुर्जीसही आहे, पेंच करा, मोहोरा माजवा, मोहोरा जिवंत करा वगैरे शब्द मात्र त्याचे ऐकण्यांत येतील. परंतु नुसते शब्द ऐकून फायदा काय ? त्याबद्दल त्यांस कांहींच ज्ञान नसल्यामुळें तें होण्याकरितां त्यांना वर सांगितलेल्या गोष्टी बुद्धिबळें खेळणारास विचाराव्या लागतील.बुद्धिबळें खेळणारे म्हणजे सगळेच सुस्वभावाचे असतात असें नाहीं. कोणीं कृपा करून वर सांगितलेल्या गोष्टी सांगितल्या तर बरें, नाहींचि सांगितल्या तर उगीच बसावें लागेल.

बुद्धिबळें खेळण्यास शिकणारानें तीं खेळण्याचें ज्ञान चांगल्या खेळणारास विचारलें व त्यानेंही सांगितलें, असें जरी घेऊन चाललें तरी काय उपयोग ! एकच गोष्ट एकदां सांगितली तरी ती ध्यानांत रा-

हण्याचें काठिण, त्यांत बुद्धिबलाच्या संबंधानें हजारों गोष्टींचें ज्ञान ( सांगणारा किती सांगेल व शिकणारा किती शिकेल ) फार कालांतरानें येणार आहे. कारण सर्वच तोंडचा कारभार, लेखी कांहीं नाहीं. एवढ्याकरितां कालांतरानें बुद्धिबळें खेळण्याचें थोडें थोडें येणारें ज्ञान जर लवकर पाहिजे व एकदम सगळें समजलें पाहिजे तर याबद्दल बुद्धिबलाचा ग्रंथ असणें अगदीं जरूर आहे असें सिद्ध होतें; व त्याचे योगानें कोणत्याही गोष्टीची अडचण न पडतां चांगल्या खेळणाराचे डावपेंच समजण्यास फार सुलभ जाईल.

जशीं बुद्धिबळें खेळण्याचीं ठिकाणें जागोजाग आहेत त्याप्रमाणेंच माझे घरीं तीं खेळण्याचें ठिकाण आहे. त्यास सुमारें सोळा सतरा वर्षें होत आलीं. तेवढ्या वेळांत असा अनुभव आला आहे कीं, कितीएक नवीन शिकणार दहा दहा बारा बारा महिने बुद्धिबळें कशीं खेळतात, हें नुसतें पहात बसत; तेंव्हां कोठें पुढें सरून प्रसंगविशेषीं एखादा चांगला डाव सांगण्याचें किंचित् सामर्थ्य त्यांस येई, ग्रंथ असता तर इतपत साधारण ज्ञान होण्यास इतका अवकाश कधींही लागला नसता.

माझ्या स्वताच्या अनुभवावरून मला पक्कें आठवतें कीं, आज पावेतों चांगले चांगले खेळणारे बरेच येऊन गेले. त्यांच्या व माझ्या डावांत ज्या ज्या झडपा झाल्या त्या सर्व कांहीं काळपर्यंत ध्यानांत रहात गेल्या, परंतु त्यांचा विचार पुनः पुनः न झाल्यामुळें आतां त्या सर्व आवगत नाहींत, त्या लिहून ठेविल्या असत्या तर मोठ्या उपयोगीं पडत्या. तात्पर्य बुद्धिबलाचा प्रत्येक डाव अगदीं निरनिराळा असून त्यांत निरनिराळे डावपेंच फारच चमत्कारिक येतात, व तें इतके कठिण अ-

सतात कीं ध्यानांत राहण्यास मारामार. एवढ्याकरितां असे तऱ्हेचे डाव लिहून ठेवणें फार जरूरीचें आहे असें दिसतें.

या जगांत पुष्कळ तऱ्हेचे खेळ आहेत. त्या सर्वांत बुद्धिबलासारखा राजमान्य व अक्कल बढविणारा खेळ हल्लीं उपलब्ध असलेले खेळांत कोणताही नाहीं. शिवाय त्यांतील विशेष खुबी ही आहे कीं, कल्पना किती वाढली तरी ती पुरेशी होत नाहीं.

उडदाबेगम ह्मणून बुद्धिबलासारखाच एक खेळ आहे ह्मणून ऐकतों. परंतु तो कोठें आमच्या पहाण्यांत आला नाहीं. व त्याबद्दल ग्रंथ आहे असेंही ऐकिवांत नाहीं. कोणी शंका घेईल कीं, बुद्धिबलाचा खेळ एवढा चांगला असून कित्येक नीच प्रतीचे तर काय पण मोठ्या प्रतीचे देखील लोक तो न खेळतां सोंगट्या, गंजिफा, पत्ते व बिझिक वगैरे खेळतात हें कसें, तर त्यांस सांगणें एवढेंच आहे कीं, कमी प्रतीचे जेवढे खेळ आहेत ते अगदीं सोपे असून ते कसे खेळावेत हें अगदीं अल्पकाळांत सहज समजतें. व बुद्धीही फारशी लागत नाहीं, तसा बुद्धिबलाचा प्रकार नाहीं. हा खेळ खेळण्याचे नियम बरेच विस्तृत असून ग्रंथ नसल्यामुळें माहितगाराचे मदतीवांचून अल्पकाळांत मनास आल्हाद होईल अशा रीतीनें खेळ खेळतां येत नाहीं व त्यांतील खरें रहस्य न समजल्यामुळें त्याची अभिरुचि लागण्यापूर्वीच खेळ कठिण समजून मनुष्य एकदम सोडून देतो, व कमी प्रतीचे खेळ खेळतो.

एतावता मागें सांगितलेल्या गोष्टीवरून बुद्धिबलाचा ग्रंथ असणें जरूर आहे असें मजपाशीं एक युरोपियन गृहस्थ बोलल्याचें आरंभीं सांगितलें आहे तें अगदीं खरें आहे.

बुद्धिबळाचा खेळ ह्मटला ह्मणजे एक स्वतंत्र शास्त्र अगर विद्या आहे असें म्हटलें तरी चालेल. त्यांत उत्पन्न होणाऱ्या तऱ्हांची यत्ता नसल्या-मुळें तो एक समुद्रच असल्यासारखा आहे. त्याबद्दल यथार्थ व इत्थंभूत विवेचन करीत बसलें तर ग्रंथ फारच मोठा होईल. बरें, अगदींच लहान थोडक्यांत करावा तर बुद्धिबळें खेळण्याचें ज्ञान जितकें यावयास पाहिजे तितकें येणार नाहीं. फार कोतें येईल. जसें—" आदौ रामतपोवनादिगमनं " या श्लोकावरून सगळें रामायण समजत नाहीं. व वाल्मीकानें केलेलें रामायण फारच मोठें असल्यामुळें अध्यात्म रामायण जसें सर्वांच्या विशेष उपयोगीं पडतें. तसा हा ग्रंथ नवीन खेळणारांस दुसऱ्याचे मदतीवांचून खेळण्याची माहिती होण्यास उपयोगीं पडावा अशा हेतूनें होईल तितका थोडक्यांत लिहिला आहे.

बाराखड्या व जोडाक्षरें समजलीं ह्मणजे कोणताही कागद जसा साधारणपणें वाचतां येतो त्याप्रमाणेंच या ग्रंथांत बुद्धिबळें खेळण्याची किल्ली अशा रीतीनें दाखविण्याचा यत्न केला आहे कीं तिच्या योगानें कोणत्याही डावांत कोणताही प्रसंग येवो तो दूर करण्याची कल्पना खेळणारांस चांगल्या रीतीनें सुचेल.

अलिकडे सुमारें वीस पंचवीस वर्षांत कितीएक लोकांनीं कितीएक कादंबऱ्या केल्या. व तीं पुस्तकें लोकांनीं घ्यावींत ह्मणून कितीएक वर्तमानपत्रें शिफारस करीत कीं, तीं संग्रहीं ठेवावींत. परंतु कादंबरीचें केवळ कल्पित गोष्टींचे पुस्तक लोकांनीं घेतलें असतां वरचेवर त्यांना त्याची जरूरी लागते असें दिसत नाहीं. कारण कीं लोक कल्पित गोष्टींचें पुस्तक क्षणभर आपलें मनरंजन होण्याकरितां एकवार वाचतात, आणि त्यांतील विषय समजल्यावर पुनः त्याकडे कोणी पहात

देखील नाहींत, असें माझ्या स्वतांच्या व कितीएकांच्या अनुभवावरून समजतें. तसा हा बुद्धिबळाचा ग्रंथ कादंबरीसारखाच आहे असें नाहीं, कारण एक दोन वेळां वाचला तरी त्याची पुनः पुनः जरूरी लागणें नाहीं असें कधींही होणार नाहीं. उलटे बुद्धिबळें खेळणारे जसजसा हा ग्रंथ वाचीत जातील तसतशी त्यांची बुद्धि तीव्र होत जाईल, आणि भुरळ पडणें, विसर होणें, चुका लागणें वगैरे प्रकार होऊं नयेत असें त्यास नजर येईल.

हा ग्रंथ एक दोन अथवा दहा पांच वेळां जरी वाचला तरी बुद्धिबळें खेळणारे तीं खेळण्यांत एकदम मोठे पटाईत होतील असें कांहीं ह्मणवत नाहीं. कारण या ग्रंथाचे योगानें तीं खेळण्याचा चांगला रस्ता मात्र त्यांस समजेल. परंतु प्रत्येक डावांत कठिण कठिण निरनिराळे येणारे प्रसंग जेव्हां त्यांस समजतील व त्याबद्दल ते जेव्हां अगदीं वाकबगार होतील ह्मणजे चुकीचे डाव कोणते, खरे हिशोबी नेमके डाव कोणते हें जेव्हां कळेल तेव्हां त्यांस बरें खेळतां येतें असें ह्मणवेल. जसें एकच कित्ता समजला परंतु तशीं अक्षरें काढण्याला वर्ष सहा महिने अक्षर घटवावें लागतें, तसेंच हा ग्रंथ वाचून वाचून खेळणें घटवावें लागेल. ह्मणजे ते पुढें चांगले खेळणारे होतील.

व्यवहारिक रीतीनेंही या खेळाचा उपयोग आहे असें दिसतें. तो असा कीं, पूर्वीं पेशवाईंत नाना फडणविसांनीं सखारामबापू यांस नजर कैदेंत ठेवून नागपूरचे भोसले ( राजे ) यांस फसविण्याच्या इराद्यानें पुण्यास या ह्मणून खलिता लिहिला व तेही मजल दोन मजल पुढें आले. एकदम पुण्यास जावें किंवा नाहीं ह्मणून त्यांनीं आपले वकिलास लिहिलें, वकिलास जबाब पाठविण्याची अडचण पडली का-

णून त्यानें बापूंची गांठ घेण्याकरितां नानांची परवानगी घेतली. नानांनींही फक्त दृष्टादृष्ट व्हावी, भाषण होऊं देऊं नये असा हुकूम दिला.

तो वकील बापूंची गांठ घेण्याकरतां गेला असतां ते व दुसरे कांहीं गृहस्थ बुद्धिबळें खेळत बसले होते. बापूंची व त्याची नजरानजर झाल्यावर खेळतां खेळतां बापू ह्मणाले कीं, राजा मागें दे ह्मणजे मात होणार नाहीं, हे शब्द ऐकून वकील निघोन गेला आणि भोंसल्यास पत्र लिहिलें कीं, परत जावें. भोंसले परत गेले हें नानास कळल्यावर चौकशीअंतीं राजा मागें दे असें बापू खेळतांना मात्र बोलले. असें त्यांस समजलें एवढ्यानेंच कार्य झालें असें ह्मणून नाना स्तब्ध राहिले.

सुमारें बाराशें वर्षांचे पूर्वींची गोष्ट वाचण्यांत आली कीं, कांहीं मुसलमान शिपाई लोक मक्केस जात असतां वाटेनें भांडूं लागले. पैकीं एका शाहण्या गृहस्थानें त्यांस असें ह्मटलें कीं राजाचा अगर वजीराचा प्यादा ( शिपाई ) जातां जातां ठिकाणावर गेला असतां तो वजीर बनतो आणि तुह्मी मक्केस जातांना भांडतां काय ?

राजा, वजीर, हत्ती व उंट हे शब्द पुल्लिंगी असून त्यांचा उपयोगही तसाच केला आहे, घोडा प्यादा हे शब्द पुल्लिंगीं आहेत परंतु या खेळाचे परिभाषप्रमाणें ह्मटलें ह्मणजे किती एक प्रसंगीं त्यांचा उपयोग नपुंसकलिंगी करतात. जसें घोडा अडीच घरें उडवा घोडें उडवा असें कोणी ह्मणत नाहीं. दोन्ही घोडीं मारून टाका ह्मणजे दुर्कीचें भयच नाहीं, राजाचा प्यादा पुढें द्या, उंटाचें प्यादें मरतें, इत्यादि.

डाव दिले आहेत ते बहुतकरून परिभाषेप्रमाणेंच आहेत परंतु कोठें कोठें मोहगम सांगण्यांत आलें आहे तें असें कीं राजा हत्तीचे घोड्याचे अगर उंटाचे अमूक घरीं द्या येथें हत्ती घोडा अगर उंट कोणता, (रा-

जाचा किंवा वजिराचा) हें कांहींच सांगितलें नाहीं; ह्मणून खेळणारास हें मोहगम सांगणें समजण्यास फार आडचण पडेल ती न पडावी ह्मणून एवढेंच सांगणें आहे कीं, राजा असेल तेथून एकच घर हालतो यांजकरतां तो हत्तीच्या, घोड्याच्या अगर उंटाच्या अमुक घरांत द्या ह्मटलें असतां खेळणारास कोणता हत्ती, घोडा अगर उंट हें सहज समजेल.

या प्रमाणेंच वजीर,हत्ती, घोडें व उंट यांबद्दल जेथें मोहगम सांगण्यांत येईल तेथें जो मोहरा सांगितलेल्या घरांत येईल तोच त्यांच घरांत खेळावा. ह्मणजे वजीर हत्तीचे, घोड्याचे, अगर उंटाचे अमुक घरीं द्या ह्मटलें ह्मणजे तो ज्या हत्तीच्या, घोड्याच्या अगर उंटाच्या सांगितलेल्या घरांत येईल तेथेंच खेळावा. मोहगम सांगितलेलें घर नेहमीं एकच असावयाचें. संशययुक्त असावयाचें नाहीं. तसेंच हत्ती हत्तीचे अमुक घरीं, घोडा घोड्याचे अमुक घरीं, अगर उंट उंटाचे अमुक घरीं द्या ह्मटलें ह्मणजे जो मोहरा सांगितलेल्या घरांत येईल तोच दिला पाहिजे वजिराचा अगर राजाचा ह्मणण्याची जरूर दिसली नाहीं. डावांत प्यादीं बरींच आहेत पण प्यादा १ घर पुढें असें जेथें सांगितलें आहे तेथें जो प्यादा एक घर सरकण्यासारखा असेल तोच १ घर खेळला पाहिजे. दोन अगर अधिक प्यादीं १ घर सरकण्यासारखीं आहेत तेथें मोहगम सांगण्यांत आलें नाहीं, अमुकच प्यादा असें सांगण्यांत आलें आहे.

डाव दिले आहेत ते केवळ कुटें बसवून दिले आहेत असें नाहीं, खेळतां खेळतां डाव निकालास लागून जेथून शेवटास गेले असे डाव दिले आहेत ह्मणून डावांत कमी ज्यास्ती मोहरीं व प्यादीं असल्यास

तीं कशाकरतां असावींत याचा विचार खेळणारानें करूं नये. कमी ज्यास्त मोहरीं किंवा प्यादीं असलीं तर असली. कांहीं कांहीं डाव कुटासारखें आहेत त्यांत मात्र वर सांगितलेला विचार शोभेल.खेळतांना निकालास लागून संपलेले डाव कोणते व कुटाचे डाव कोणते, हें खेळणारांस ग्रंथांत दिलेले डाव पाहिल्यानंतर सहज कळेल.

डाव दिले आहेत त्या सर्वांत बुद्धिबलाचा आकार देण्याचा विचार होता पण तशा आकाराचे टाईप नसल्यामुळें आणि दोन्ही रंगाचे आकार सारखे असल्यामुळें तांबड्या रंगाचीं बुद्धिबळें कोणतीं व हिरव्या रंगाची बुद्धिबळें कोणती हें स्पष्ट रीतीनें समजणार नाहीं ह्मणून मोहऱ्यांचीं व प्याद्यांचीं मूळाक्षरें डावांत दिलीं आहेत. त्यांत तांबड्या रंगाचीं मोहरीं व प्यादीं समजण्याकरतां त्यांचीं मूळाक्षरें जाड ठेवलीं आहेत व हिरव्या रंगाचीं अक्षरें बारीक ठेवलीं आहेत, येणेंकरून तांबडा रंग कोणता व हिरवा रंग कोणता हें खेळणाराचे ध्यानांत सहज येईल.

डावांत ज्या ज्या घरांत अक्षरें दिलीं आहेत त्याप्रमाणें तांबड्या व हिरव्या रंगाचीं मोहरीं व प्यादीं पटांत मांडून खेळणारानें स्वतः डाव सोडवावेत, सुटले अगर नच सुटले तर मग ग्रंथांत प्रत्येक डावाचे दिलेले डाव पहावेंत ह्मणजे खेळणारास मजा वाटत जाईल.

प्रत्येक प्रकरणांत दिलेल्या डावापैकीं मुळारंभीचें डाव अगदीं साधे व सोपे. आहेत परंतु जसजसे पुढचे डाव खेळणारे पाहत जातील तसतसी मजा ज्यास्त ज्यास्स येऊन मनास आल्हाद होत जाईल.

ग्रंथांत कोठें कोठें अशुद्ध पडलें आहे त्याचें शुद्धीपत्र ग्रंथाचे शेवटीं दिलें आहे. ग्रंथांत राहिलेलें अशुद्ध शुद्धिपत्रांत देतां येत नाहीं

असें अशुद्ध ग्रंथांत तसेंच राहिलें आहे तें असें कीं, कोठें दीर्घ व दिर्घाचें र्‍हस्व, कोठें काना, मात्रा व वेलांटी उडाल्या कोठें स्वल्पविराम चिन्हाबद्दल पूर्ण विराम चिन्ह पडलें आहे पूर्ण विराम चिन्हाबद्दल दोन दोन बिंदू पडून पुढें रेघ पडल तर अशा ज्या क्षुल्लक चुका असतील त्यांकडे खेळणारानें देतां अशुद्ध असेल तेथें शुद्ध करून घेऊन ग्रंथातलें रहस्य मा एवढी प्रार्थना आहे.

एकंदर डाव सुमारें अडीचशें आहेत. पैकीं मात बुर्जीचे वजीर, हत्ती, घोडा व उंट ठेवून बुर्जी किंवा मात झाली असें ह्मणत नाहीं; पण प्यादींचे डावास मात्र वजीर, हत्ती, घोडा अगर कांहीं मोहोरीं ठेवून प्यादी झाली असें म्हणतात. ग्रंथां दींचे डाव दिले आहेत. त्यांत कांहीं उंट ठेवून, कांहीं घोड कांहीं हत्ती ठेवून, कांहीं वजीर ठेवून व कांहीं बरींच मोहोरीं प्याद्या आहेत त्यांत कांहीं सहज झाल्या आहेत व कांहीं वणीनें झाल्या आहेत. गलगुटावणीच्या प्याद्याची खूण एवढं कोणतेंही मोहरें इरेंतून सुटावें व पुनः इरेस सांपडावें, मा सत नाहीं.

गलगुटावण अथवा पक्कड हा शब्द आमच्याच खेळण्याचे उत्पन्न झाला आहे. इतर बुद्धिबळें खेळण्याचे ठिकाणीं हा शब्द नसेल; ज्या रीतीला आम्ही गलगुटावण म्हणतों त्या रीतीला सरें कांहीं ह्मणत असतील अगर तसाच निर्वाह करीत असती लगुटावण काय हें पहिले प्रकरणांत सांगितलें आहे.

खेळण्यांत पंच मोहरी व घोडा उडणें अगर न उडणें ह्यां

हमीं लढे पडतात ते न पडावे ह्मणून मीं सयुक्तिक निकाल दिला आहे. कोणास तो बरा वाटल्यास त्याप्रमाणें चालावें.

हा ग्रंथ वरचेवर वाचीत गेलें असतां व यांतले डाव पहात असतां मनाची एकाग्रता फार चांगली होते, बुद्धि वाढत जाते, आणि कुव्यसन लागण्याचा संभव फारच कमी रहातो.

अगदीं शेवटीं प्यादीचे डाव दिले आहेत ते कठिण असून फारच मजेचे आहेत ते खेळणारानें स्वतः सोडवावे, नच सुटले तर ते कसे सोडवले आहेत याबद्दल आमचेकडे उलगड्याचे डाव मागवावेत.

हा ग्रंथ करण्यास आधार ह्मटला तर कांहींच मिळाला नाहीं. सुचलें तसतसें जुळीत गेलों. एकच घोडा त्रेसष्ट घरांतील बुद्धिबळें कशीं मारतो याबद्दल थोडीशी मदत मिळाली व दिलेले डाव कांहीं कांहीं आयतेच घेतले बाकी सर्व मनःकल्पित आहेत.

ह्या ग्रंथास बुद्धिबलक्रीडा हें नांव देऊन तो लोकांपुढें मोठ्या नम्रतेनें सादर केला आहे तर त्यांनीं, जसें सुवर्णाचे वाळूंतील सोन्याचे कण घेऊन वाळू टाकणें, याप्रमाणें जें बरें दिसेल तें घेऊन दोषाकडे लक्ष न देतां ग्रंथ बरा आहे असें म्हटलें ह्मणजे माझ्या श्रमाचें सार्थक झालें असें मी समजेन.

विनायक राजाराम टोपे.

सूचनाः—हा ग्रंथ वाचतांना व यांतील डाव पहातांना शुद्धिपत्र पहात जावें.

या ग्रंथाची पुस्तकें मागविणें झाल्यास आमचेकडे मागवावीत.

विनायक राजाराम टोपे,

पुणें पेठ शनिवार नातूचे हौदाजवळ रुप्याची भांडीं करतात त्या वाड्यांत घर नं० ५३०.

## अनुक्रमणिका

श्रीगजानन प्रसन्न.

---

## प्रकरण १.

# बुद्धिबलक्रीडा.

---

बुद्धिबलक्रीडा ह्मणजे बुद्धिबलांचा खेळ हा खेळ दोघांचाच आहे.

**या खेळाचीं मूलतत्त्वें, व्याख्या आणि त्यांत बहुतकरून येणारें शब्द.**

## मूलतत्त्वें.

### बुद्धिबळें.

बुद्धिबळें एकंदर बत्तीस असतात.

**बुद्धिबलांचा आकार व नांवें.**



| राजा. | वजीर. | हत्ती. | घोडा. | उंट. | प्यादें. |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |

**प्रत्येक नांवाची संख्या.**

| राजे | वजीर | उंट | घोडे | हत्ती | प्यादीं |
|---|---|---|---|---|---|
| २ | २ | ४ | ४ | ४ | १६ |

## नीट समोरचीं घरें.

पटाची कोणतीही ओळ.

## आडवीं घरें.

पटाची कोणतीही ओळ.

## तिरकस घरें.



पटाची तिरकस ओळ तिहीं पेक्षां जास्त कितीही घरांची कोणत्याही बाजूची.



## आडीच घरें.

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | | |
| | | | | | | | |
| | | १ | | २ | | | |
| | ८ | | | | ३ | | |
| | | | घोडा | | | | |
| | ७ | | | | ४ | | |
| | | ६ | | ५ | | | |
| | | | | | | | |

घोड्यापासून १ घोड्यापासून २ घोड्यापासून ३ तों ८ पर्यंत अडीच घरें होतात, अशीं कोणत्याही एका घरापासून दुसरीं अडीच घरें समजावीं.

## एकच नीट समोरचें अथवा मागचें घर.

नीट समोरचें घर



मागचें घर.

कोणत्याही नीट समोरच्या ओळीचें;

## एकच आडवें घर.



आडव्या ओळीचें
कोणतेंही घर.

## एकच तिर्पें घर.



कोणत्याही तिर्कस
ओळीचें घर.

## पटावर बुद्धिबळें मांडण्याचीं स्थानें.

पटाच्या पहिल्या आडव्या ओळीच्या दोन कोंपऱ्यांच्या दोन घरांत एकाच रंगाचे हत्ती मांडावेत. त्याच ओळींत प्रत्येक हत्तीचे आलीकडील घरांत एक एक घोडा मांडावा व त्याच ओळींत प्रत्येक घोड्याशेजारीं एक एक उंट मांडावा. त्याच ओळींत उजवीकडच्या उंटाचे आलीकडील घरांत राजा व राजाशेजारीं वजीर मांडावा. त्याच रंगाचीं प्यादीं प्रत्येक मोहऱ्यापुढें पुढचे ओळींत मांडावीं. एका रंगाचीं बुद्धिबळें मांडलीं ह्मणजे दुसऱ्या रंगाचीं बुद्धिबळें त्याप्रमाणेंच पटाचे शेवटचे ओळींत मोहरीं व पुढील ओळींत प्यादीं मांडावीं. आकृति पहा.—

## हिरवा रंग.

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| हत्ती | घोडा | उंट | राजा | वजीर | उंट | घोडा | हत्ती |
| प्यादें | प्यादें | प्यादें | प्यादें | प्यादें | प्यादें | प्यादें | प्यादें |
| | | | | | | | |
| | | | | | | | |
| | | | | | | | |
| | | | | | | | |
| प्यादें | प्यादें | प्यादें | प्यादें | प्यादें | प्यादें | प्यादें | प्यादें |
| हत्ती | घोडा | उंट | वजीर | राजा | उंट | घोडा | हत्ती |

## तांबडा रंग.

## व्याख्या.

### मारा.

मारा ह्मणजे मारण्याची शक्ति.

### मारामारी.

मारामारी ह्मणजे दोन्ही रंगांचे मोहऱ्यांनीं व प्याद्यांनीं एकमेकांस मारणें.

## जोर.

जोर ह्मणजे एकाच रंगाचे मोहऱ्यांनीं व प्याद्यांनीं एकमेकांस बळ करणें अथवा एकमेकांचें एकमेकांस बळ असणें.

## बिनजोर.

बिनजोर ह्मणजे एकाच रंगाचे मोहऱ्यास अथवा प्याद्यास एकमेकाचें बळ ( जोर ) नसणें.

## शह.

एका रंगाचा राजा ज्या घरांत असेल त्या घरावर उलट रंगाच्या मोहऱ्यानें किंवा प्याद्यानें मारा करणें.

## नाशह.

राजा ज्या घरांत असेल त्या घरावर मारा केला असतां तो नाहींसा करणें.

## काटशह.

कोणत्याही एका ओळींत एका रंगाच्या मोहऱ्याचा मारा असून त्याच ओळींत उलट रंगाचा राजा आहे पण या दोहोंमध्यें मारा असलेल्या मोहऱ्याच्या रंगाचा दुसरा मोहरा किंवा प्यादा आहे, तर मध्यें असलेला मोहरा अगर प्यादा मधून काढून दुसरे घरीं खेळणें आणि मारा असलेल्या मोहऱ्याचा शह देणें.

## शह आणि काटशह.

मधून काढलेल्या मोहऱ्याचा अथवा प्यादाचा शह असून मारा असलेल्या मोहऱ्याचा शह बसणें.

### शहशह.

शहामागें शह लागणें.

### ईर अथवा इरेस घालणें.

शह आला असतां मोहरा अथवा प्यादा आड घालणें.

## मोहोऱ्यांची गति.

### राजा.

राजा एकच नीट समोरचे, नीट मागचे, आडवे, (उजवीकडे व डावीकडे) आणि तिर्पे घरीं जातो, तसेंच जोर करतो व मारतो. शह लागण्याचे पूर्वी मात्र एकदां आडीच घरें जातो.

### वजीर.

वजीर हवीं तितकीं घरें नीट समोर, नीट मागें, आडवीं ( उजवीकडे व डावीकडे ) जातो, तसाच जोर करतो व मारतो.

### हत्ती.

हत्ती हवीं तितकीं घरें नीट समोर, नीट मागें आडवीं ( उजवीकडे व डावीकडे ) जातो, तसाच जोर करतो व मारतो.

### घोडा.

घोडा अडीच घरें जातो, अडीच घरांनीं जोर करतो व मारतो.

### उंट.

उंट हवीं तितकीं तिरकस घरें मागें व पुढें जातो. तिरकस जोर करतो व मारतो.

## प्याद्यांची गति.

### प्यादें.

प्यादें एकच घर नीट समोर जातें, एकच तिर्पे घरानें जोर करतें व मारतें.

## खेळांत बहुतकरून येणारे शब्द.

### पेंच.

पेंच ह्मणजे कुसींनें खेळणें.

### डाव.

प्रत्येक खेळणाराची पाळी ( हात ) व खेळास आरंभ होऊन शेवट होणें.

### चूक.

चूक ह्मणजे खरा डाव न खेळणें.

### माज अथवा माजणें.

माज ह्मणजे डावाच्या अखेरीस राहिलेल्या मोहऱ्यांनीं माऱ्यांत असतील व माऱ्यांत येतील तीं मोहरीं व प्यादीं जोरी व बिनजोरी मारणें.

### गलगुटावन अथवा पकड.

माजलेला मोहरा धरसोडीनें आकळणें अथवा आपल्या राजास शह येऊं न देण्यास आडवणें.

या प्रमाणें मूलतत्त्वें, व्याख्या व खेळांत फार करून येणारे शब्द

यांचें दिग्दर्शन या प्रकरणांत केलें आहे. तेणेंकरून बुद्धिबलांची, पटाची, मारा आदिकरून व्याख्यांची वगैरे माहिती खेळणारास बरीच होईल. पुढील प्रकरणांत या प्रकर्णांतील कांहीं वर्णन विस्तारेंकरून केलें आहे. त्याचे योगानें झालेली माहिती वाढून खेळणाराचें ज्ञान वृद्धिंगत होईल.

---

## प्रकरण २.

# बुद्धिबल क्रीडा.

उभयता खेळणारांनीं एकमेकांसमोर बसून एक एक रंगाचीं बुद्धिबलें मागें सांगितल्याप्रमाणें मांडावीं आणि पुढील प्रत्येक प्रकर्णांत दिलेली माहिती ध्यानांत ठेऊन खेळावें. उभयतां खेळणारांपैकीं एकास स्पर्धी व दुसऱ्यास प्रतिस्पर्धी ह्मणतात.

### बुद्धिबलांचा आकार व नांवें.

मागें आकार दिले आहेत ते काल्पनिक असून सर्वत्र मान्य आहेत, त्याहून भिन्न आकाराचीं बुद्धिबलें क्वचित आहेत, परंतु तीं फारकरून प्रचारांत नाहींत ह्मणून त्यांचे आकार दाखविले नाहींत. तसेंच भाषाभेदानें नांवांत बदल आहे तो असा कीं, वजिरास फर्जी ह्मणतात.

### बुद्धिबलांचा भेद.

राजा खेरीज करून वजीर व हत्ती यांस मोठीं मोहरीं ह्मणतात. आणि घोडें व उंट यांस लहान मोहरीं ह्मणतात. एकंदर मोहऱ्यांस लहान मोठीं मोहरीं ह्मणतात.

## बुद्धिबलांचा रंग.

फार करून बुद्धिबलांचा रंग तांबडा व हिरवा असतो, कोठें कोठें पांढरा व काळा, अगर तांबडा असतो.

## पट.

पट बहुतकरून खारव्याचा अथवा सकलादीच असतो. क्वचित लांकडाच्या *तक्त्याचा असतो, त्यास ज्या फुल्या असतात त्या केवळ शोभेकरितां असतात. खेळण्यांत त्यांचा कांहीं उपयोग नाहीं. पण खेळणारा समोरील आडवे पहिले ओळींतील फुलीचीं घरें ( उजवीकडे राजा व डावीकडे वजीर ) राजे वजीर मांडण्याचीं स्थानें आहेत.

---

*असा पट बहुतकरून युरोपीअन लोकांत असतो. त्यास प्रत्येक ओळींत एक पांढरें व शेजारचें काळें अशीं चार पांढरीं व चार काळीं घरें असतात.

## पटाच्या घरांची गणती.

### नीट समोरचीं घरें.

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |

आकृतींत १ पासून १, २ पासून २, ३ पासून ३, ४ पासून ४, ५ पासून ५, ६ पासून ६, ७ पासून ७ आणि ८ पासून ८ पर्यंत अशा आठ आठ घरांच्या ज्या आठ ओळी आहेत त्यांस उभ्या पट्ट्या ह्मणतात.

## आडवीं घरें.

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ |
| २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ |
| ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ |
| ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ |
| ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ |
| ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६ |
| ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ |
| ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ |

आकृतींत १ पासून १ तों ८ पासून ८ पर्यंत ज्या आठ ओळी आहेत त्यांस अडव्या पट्ट्या ह्मणतात.

## तिरकस घरें.

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | १ | २ | १ | २ | १ | २ |
| २ | १ | २ | १ | २ | १ | २ | १ |
| १ | २ | १ | २ | १ | २ | १ | २ |
| २ | १ | २ | १ | २ | १ | २ | १ |
| १ | २ | १ | २ | १ | २ | १ | २ |
| २ | १ | २ | १ | २ | १ | २ | १ |
| १ | २ | १ | २ | १ | २ | १ | २ |
| २ | १ | २ | १ | २ | १ | २ | १ |

आकृतींत १ पासून १ व २ पासून २ पर्यंत अशा आठ आठ घराच्या ज्या दोन तिर्कस ओळी आहेत त्यांस नळांडी किंवा नाळ ह्मणतात, त्याहून कमी घराच्या तिर्कस ओळींसही नळांडी ह्मणतात. कोणत्याही नळांडीच्या प्रत्येक घरास पग ह्मणतात. पग हा शब्द फक्त उंटाचे संबंधानें उपयोगांत येतो. जसें आमक्या उंटाचे पगांतील मोहरीं व प्यादीं काढून घ्या.

## अडीच घरें.

मागें आकृतींत अडीच घरें दिलीं आहेत त्यांस कांहीं नांव नाहीं.

खेळतांना अडीच घरें समजणें फार अवघड आहे याजकरतां तीं स्वल्प-रीतीनें समजावींत ह्मणून एक साधारण नियम पुढें दिला आहे.

सर्व मोहऱ्यांत अडीच घरें जाणारें मोहरें घोडाच आहे. तर तो ज्या घरांत असेल त्या घरापुढचें घर, मागचें घर, उजवीकडचें घर, डावीकडचें घर अशीं जीं घरें असतील तीं सोडून, व तसेंच त्याच घराचीं तिर्पीं घरें सोडून, पुढच्या, मागच्या, उजवीकडच्या व डावी-कडच्या घरांचीं तिर्पीं घरें अडीच घरें होतात.

कांहीं कोष्टकें शेवटीं दिलीं आहेत तीं पाहिलीं असतां अडीच घरांची समज चांगली येईल.

### एकच नीट समोरचें अथवा मागचें घर.

उभ्या पट्टीचे कोणतेही घरापुढील घर, एकच नीट समोरचें घर समजावें व मागील घर मागचें समजावें.

### एकच आडवें घर.

आडव्या पट्टींतील कोणत्याही घराशेजारचें घर, आडवें घर समजावें.

### एकच तिर्पें घर.

नळांडीचें प्रत्येक घर तिर्पें समजावें.

### पटावर बुद्धिबळें मांडण्याचीं स्थानें.

पटावर बुद्धिबळें मांडण्याचीं स्थानें पूर्वी सांगितलीं आहेत तीं ब-हुतकरून चहूंकडे सारखींच असतात, परंतु युरोपिअन आदिकरून

लोकांत मात्र थोडा भेद आहे, तो एवढा कीं ते राजासमोर राजा व वजिरासमोर वजीर मांडतात.

## मारा.

मारण्याची शक्ति ह्मणजे एका रंगाच्या मोहऱ्यांच्या व प्याद्यांच्या गतींच्या घरांत उलट रंगाचा मोहरा अथवा प्यादा आला तर मारतात ह्मणून अमुक घरांत अमुक मोहरा अथवा प्यादा येईल, अमुक घरांत शह येईल, अमुक घरांत इरेस सांपडेल, अमुक घरांत मोहऱ्याला जोर होईल, इत्यादि गोष्टी होऊं नयेत ह्मणून तीं घरें उलट रंगाच्या मोहऱ्याच्या अथवा प्याद्याच्या गतीच्या घरांत येतील अशीं मोहरीं व प्यादीं खेळणें यास मारा किंवा मारण्याची शक्ति ह्मणतात. कदाचित् प्रतिपक्षाचा मोहरा किंवा प्यादा त्याच घरांत आला तर त्यास मारा ठेवलेल्या मोहऱ्यानें अथवा प्याद्यानें मारतां यावें.

एखाद्या घरांत अमुक मोहरा अथवा प्यादा आला असतां तो फारच बळक होईल ह्मणून त्या घरांत तो येऊं देऊं नये याजकरितां ह्मणतात कीं, अमुक मोहऱ्याचा अथवा प्याद्याचा त्या घरावर मारा ठेवा ह्मणजे येणारा मोहरा अगर प्यादा मारतां येईल.

मारा शब्दाचा उपयोग डावाच्या शेवटीं शेवटीं फार होतो. जसें अमुक मोहऱ्याच्या माऱ्यांतील मोहरीं व प्यादीं काढा.

प्रत्येक घरावर नऊपर्यंत मारे होतात. मारा असलेल्या घरांत त्याच रंगाचा मोहरा अथवा प्यादा आला तर जितके मारे तितके जोर समजावेत.

## मारामारी.

मारामारी ह्मणजे एका रंगाचा मोहरा अथवा प्यादा ज्या घरांत असेल त्या घरावर उलट रंगाचा मारा असल्यास तो मारून मारणारा मोहरा अथवा प्यादा त्याच घरांत ठेवणें. दोन बुद्धिबळें पटाचे कोणत्याही एका घरांत कधींही असावयाचीं नाहींत व येणारही नाहींत. ह्मणून मेलेला मोहरा अथवा प्यादा पटाबाहेर काढून टाकणें यास मारामारी ह्मणतात.

एका रंगाचीं मोहरीं व प्यादीं दुसऱ्या रंगाच्या मोहऱ्यांस व प्याद्यांस जोरी बिनजोरी मारतात; राजा मरत नाहीं ह्मणून त्यास मारीत नाहींत. मोहऱ्यास व प्याद्यास जितके जोर असतील व त्यांवर जितके मारे असतील तितके हात मारामारी लांबते.

राजाजवळ पुष्कळ मोहरीं जमलीं ह्मणजे ह्मणतात कीं, मोहरीं फार जमलीं मारामारी करून लागू मोहरीं काढून टाका.

## जोर.

एका रंगाच्या मोहऱ्याच्या अगर प्याद्याच्या गतीच्या घरांत त्याच रंगाचा मोहरा किंवा प्यादा असेल किंवा येईल तर ज्या मोहऱ्याच्या किंवा प्याद्याच्या गतीच्या घरांत तो आहे किंवा येणार त्यास त्या घराच्या गतीच्या मोहऱ्याचा किंवा प्याद्याचा जोर आहे असें समजावें.

त्याच रंगाचा मोहरा अथवा प्यादा त्याच रंगाचे कोणत्याही मोहऱ्याच्या किंवा प्याद्याच्या गतीच्या घरांत नाहीं तर तो ज्या घरांत

असेल तें घर ज्या मोहऱ्याच्या किंवा प्याद्याच्या गतीच्या घरांत येईल असें तें मोहरें किंवा प्यादें खेळावें ह्मणजे यास जोर करणें ह्मणतात.

एका रंगाचीं मोहरीं व प्यादीं दुसऱ्या रंगाच्या मोहऱ्यांनीं व प्याद्यांनीं मरत असल्यास मरणारे मोहऱ्यास आथवा प्याद्यास त्याच रंगाचीं सर्व मोहरीं एक उंट खेरीज करून व दोनच प्यादीं आपआपल्या गतीनें जोर करूं शकतात, त्यास एकजोर, दोनजोर, तीनजोर, चार जोर, पांच जोर इत्यादि ह्मणतात. कोणत्याही घरांत कोणत्याही मोहऱ्यास अथवा प्याद्यास नऊ जोरापेक्षां ज्यास्त जोर होत नाहींत.

अध्यर्या मुध्यर्या डावांत अगर डावाचेशेवटीं एकाचा लहान मोहरा मोहऱ्यानें फुकट जाण्याचा चांगला संभव आहे, परंतु त्यास प्याद्याचा जोर झाला ह्मणजे तो संभव मुळींच नाहींसा होतो अशावेळेस प्याद्याचा जोर दगावणारे मोहऱ्यास झाला ह्मणजे त्यास मुस्तकीम जोर ह्मणतात. कारण तो मोहऱ्यानें मारलाच तर जोर केलेल्या प्याद्यानें मारतां येईल.

एकाच पट्टींत वजिरावर वजीर अगर हत्तीवर हत्ती व एका नळांडींत उंटावर उंट असेल आणि त्याच पट्टींत आणि नळांडींत एकमेकाचें मोहरें अथवा प्यादें एकमेकाच्या आड आहे दुसरें कांहीं एक नाहीं तर तें मोहरें अथवा प्यादें बिनजोरी दिसतें; परंतु त्या प्रत्येकास वजीर हत्ती व उंट यांचा पाठीमागून जोर असतो अशा जोरास पाठजोर ह्मणतात.

असा बिनजोरी दिसलेला मोहरा अथवा प्यादा मारा असल्यास, बिनजोरी समजून दुसऱ्या मोहऱ्यानें मारतां येईल.

घोड्याचा घोड्याला जोर असला ह्मणजे त्यास घोडगांठ ह्मणतात.

## बिनजोर.

मरणारे मोहऱ्यास अथवा प्याद्यास जोर नसणें अथवा जोर न होणें.

## शह.

राजा ज्या घरांत असेल त्या घरावर मारा करणें, मग तो कोठेंही असो यास शहदेणें ह्मणतात. मारा होण्याचा संभव असणें यास शह येणें असें ह्मणतात.

शह दिला असतां शहदेणारानें "शह" असा उच्चार करण्याची रूढी आहे, मग तो शह, शह आलेल्या राजानें स्थळांतर करून, मोहरें अथवा प्यादें इरेस घालून, अगर ज्या मोहऱ्याचा अथवा प्याद्याचा शह आला असेल त्यांवर मारा असल्यास त्यास मारून काढावा आणि "नाशह" ह्मणावें अशी रूढी आहे.

जोरांतल्या एकाद्या मोहऱ्याचा अथवा प्याद्याचा शह राजास भिडूनच आला तर मात्र राजास स्थळांतर करणें भाग आहे. भिडून शह देणारे मोहऱ्यावर अथवा प्याद्यावर मारा असेल तर वाटल्यास त्यास मारावें. भिडून शहाला कांहीं इरेस घालतां येत नाहीं.

घोड्याचा शह येऊन मोहरा अथवा प्यादा जात असेल तर मात्र त्यास दुरूक शह ह्मणतात.

## नाशह.

शह आला असतां राजाचें स्थळांतर करावें, मोहरें अथवा प्यादें इरेस घालावें, अथवा ज्या मोहऱ्याचा अथवा प्याद्याचा शह आ-

ले असेल त्यावर मारा असल्यास तें मारावें आणि शह नाहींसा करावा.

नाशह करणें झाल्यास स्थळांतर करणें, इरेस घालणें आणि मारणें हें शह आलेल्या राजाचे खुषीवर आहे.फायदेशीर वाटेल तर स्थळांतर करील, इरेस घालील आथवा मारील.

## काटशह.

एका रंगाचा मोहरा अथवा प्यादा मधून काढून त्याच रंगाचा दुसऱ्या मोहऱ्याचा शह बसणें ह्मणजे एका रंगाचा वजीर, हत्ती व उंट या मोहऱ्यांपैकीं कोणत्याही मोहऱ्याच्या माऱ्यांत राजा असून त्याच मोहऱ्यांच्या रंगाचा कोणताही मोहरा अथवा प्यादा राजा व तें मोहरें यांचे मधें आहे तर मधें असलेलें मोहरें अथवा प्यादें दुसरीकडे खेळून मारा असलेला मोहऱ्याचा शह देतात यास काटशह ह्मणतात.

काटशहानें जो मोहरा अथवा प्यादा काढतात तो प्याद्याखालीं असो, बिनजोरी असो अथवा कोणत्याही जोरी बिनजोरी मोहऱ्या वर अथवा प्याद्यावर पडला असो, त्याकडे खेळणारानें विशेष लक्ष न देतां ज्या मोहऱ्याचा काटशह असेल त्यावर मारा असल्यास मारावें. मारावयाचा नसेल तर स्थळांतर करावें. कदाचित् मधून निघालेला मोहरा राजाचे माऱ्यांत आला तर वाटत असल्यास मारावा, अगर मधून निघालेला मोहरा ज्या बिनजोरी मोहऱ्यावर पडला असेल तें मोहरें इरेंत येत असल्यास इरेस घालून जगत असल्यास जगवावें आणि काटशहानें आलेल्या शहाचा नाशह करावा.

## शह आणि काटशह.

काटशहाच्या वेळेस मधून निघालेल्या मोहऱ्याचा शह नसतो. ज्या वेळेस मधून निघालेल्या मोहऱ्याचा शह बसून काटशह येतो त्या वेळेस त्यास शह आणि काटशह ह्मणतात.

शह आणि काट शह आला कीं, राजास दुहेरी शह बसतो, एकच हातानें दोनही शहाचा, मारामारी करून अथवा कांहीं इरेस घालून नाशह करणें अशक्य आहे ह्मणून राजानें स्थलांतरच केलें पाहिजे. यदाकदाचित् काटशहानें निघालेल्या मोहऱ्याचा अथवा प्याद्याचा शह राजास भिडून बिनजोरी आला तर मात्र राजा त्यास वाटेल तर मारील.

## शहशह.

शहामागें शह लागणें ह्मणजे राजास पुनः पुनः एका मागून एक शह येतात. असे शह आलेल्या राजाचे एकंदर डावाची स्थिति अशी असते कीं, शह देणारे मोहऱ्यास मारतां येत नाहीं. कोणतेंही मोहरें अथवा प्यादें इरेस घालववत नाहीं. शह न येईल अशा घरींही जातां येत नाहीं. शह शह चुकत नसले तर डावाचा शेवट समजून डाव संपवतात. शह शह फार करून एकाच मोहऱ्याचे असतात.

## ईर अथवा इरेस घालणें.

शह आला असतां मोहरा अथवा प्यादा आड घालतात आणि नाशह करतात. इरेस घातलेल्या मोहऱ्याचा अथवा प्याद्याचा जोर इतर मोहऱ्यास अथवा प्याद्यास असेल तर तो जोर, तें मोहरें अथवा प्यादें इरेस आहे तोंपर्यंत नाहीं असें समजावें, परंतु इरेस असलेल्या

मोहऱ्याचा शह बसला कीं, त्याचा नाशह करणें भाग आहे. इरेस असलेल्या मोहऱ्याचा अथवा प्याद्याचा जोर जसा नाहीं तसाच त्याचा शहही नाहीं असें समजूं नये.

इरेस असलेल्या मोहऱ्याच्या आथवा प्याद्याच्या जोरांतलें मोहरें आथवा प्यादें बिनजोरी समजून मोहऱ्यांनीं व प्याद्यांनीं जसें मारतां येतें तसे बिनजोरी समजून राजानें मारतां येत नाहीं.

## मोहऱ्यांची गति.

### राजा.

दोनही रंगाचे राजे एकच घर मागें, पुढें, आडवे आणि तिर्पे जातात. परंतु ज्या घरावर एका रंगाच्या मोहऱ्याचा अथवा प्याद्याचा मारा आहे त्या घरांत उलट रंगाचा राजा कधीं असणार नाहीं व जाणारही नाहीं. राजाचा मारा एकच घरावर असतो ह्मणून ते कधींही एकमेकांशेजारीं यावयाचे नाहींत. ते एकमेकास मारीत नाहींत, तसेच एकमेकाच्या मोहऱ्यांनीं व प्याद्यांनीं मरत नाहींत. व ते स्वतां एकमेकाचीं मोहरीं व प्यादीं बिनजोरीं त्यांचे माऱ्यांत आल्यास मारतात, जोर असल्यास मात्र मारूं शकत नाहींत. शह आला असतां त्यांचा अडीच घरें जाण्याचा हक्क जातो, तो येण्यापूर्वी मात्र एकदांच ते अडीच घरें जातात, परंतु घोड्यासारखे अडीच घरांनीं मारीत नाहींत व जोरही करीत नाहींत. ते डावाचा शेवट होईपर्यंत कायम असतात. इतर मोहरीं व प्यादीं ह्यांच्या प्रमाणें नाहींसे होत नाहींत.

## वजीर.

दोनही रंगाचे वजीर हवीं तितकीं घरें नीट समोर नीट मागें पुढें आडवे आणि तिर्कस जातात. परंतु तीं सगळीं घरें खुलीं पाहिजेत, त्यांचे गतीच्या घरांत कोणत्याही रंगाचा मोहरा अथवा प्यादा असेल तर मात्र ते त्याला ओलांडून आलिकडे अथवा पलिकडे जात येत नाहींत. घरें खुलीं असतील तेथपर्यंतच जातात. ते एकमेकांस व एकमेकांच्या मोहऱ्यास व प्याद्यास मारतात. आपआपले रंगाचे मोहऱ्यास अथवा प्याद्यास जोर करतात. ते मेले असतां जीवंत* होतात.

## हत्ती.

दोन्ही रंगाचे हत्ती उभ्या व आडव्या पट्टींत हवीं तितकीं घरें मागें पुढें आडवे खुल्या घरापर्यंत नीट जातात. ते एकमेकांस व एकमेकांचे मोहऱ्यास व प्याद्यास मारतात, एका रंगाचे हत्ती आपआपणास व आपआपले रंगाचे मोहऱ्यास व प्याद्यास जोर करतात आणि मेले असतां पुनः जीवंत होतात.

## घोडा.

घोडे अडीच घरें जातात. त्यांचे गतींत कांहींही आड येत नाहीं, त्यांचें अडीच घरें जाण्याचें घर मात्र खुलें असलें पाहिजे. दोन्ही रंगाचे घोडे एकमेकांस व एकमेकांचे मोहऱ्यास व प्याद्यास मारतात. एक रंगाचे घोडे आपआपणास व आपआपले रंगाचे मोहऱ्यास व प्याद्यास जोर करतात. आणि मेले असतां पुनः जीवंत होतात.

---

* जीवंत कसें होतात हें पुढे सांगण्यांत येईल. प्रकरण नं० ८.

### उंट.

दोन्ही रंगाचे उंट हवीं तितकीं घरें मागें पुढें तिर्कस जातात, परंतु त्यांचे गतींत कोणतेंही मोहरें अथवा प्यादें असेल तर मात्र तें खुलीं घरें असतील तेथपर्यंतच जातात. प्रत्येक रंगांचे दोन्हीं उंटाचीं तिर्कस घरें अगदीं निरानिराळीं आहेत. दोन्हीं रंगाचे जे उंट एका नक्षांडींत एकमेकांवर येतात त्या उंटास एकपगी उंट ह्मणतात, तसेच दोन्ही रंगांचे जे उंट एकमेकांवर येत नाहींत त्या उंटास बेपगी उंट ह्मणतात, एकपगी उंट एकमेकांस मारतात. बेपगी उंटाचा मारा एकमेकांवर पोंचत नाहीं ह्मणून ते एकमेकांस मारीत नाहींत. दोन्ही रंगांचे उंट एकमेकांच्या मोहऱ्यास व प्याद्यास मारतात. एका रंगाचे उंट आपआपले मोहऱ्यास व प्याद्यास जोर करतात. पण एकमेकांस जोर करूं शकत नाहींत आणि मेले असतां पुनः जीवंत होतात.

## प्याद्याची गति.

### प्यादें.

दोन्ही रंगांचा एक एक प्यादा एकच घर नीट समोर पुढें जातो परंतु राजे, वजीर व हत्ती यांचे पुढील प्यादीं ते जागचे हालण्यापूर्वीं हावीं असल्यास दोन दोन घरें नीट समोर प्रथमतः एकदांच मात्र पुढें जातात. कोणताही पुढें गेलेला प्यादा मोहऱ्याप्रमाणें मागें येऊं शकत नाहीं. दोन्ही रंगांचीं प्यादीं एकमेकांस व एकमेकांचे मोहऱ्यास एकच तिर्पें घरीं मारतात. एक रंगाचीं प्यादीं होईल तेथें आपआपणास व आपआपले मोहऱ्यास मारण्याच्या गतीनें जोर करतात. प्यादा प्याद्यास, घोड्यास व हत्तीस जोर करतो परंतु तो एकमेकास पर-

स्पर जोर होत नाहीं. वजिरास जोर करतो तो मात्र परस्पर जोर होतो. तसाच उंटास जोर केल्यास तोही परस्पर जोर होतो. परंतु वजिरानें व उंटानें मागून प्याद्यास जोर केला तर तो परस्पर जोर होत नाहीं. ज्यावेळेस प्याद्याचा उंटास व उंटाचा प्याद्यास परस्पर जोर होतो त्यावेळेस त्यांस बापबेटे ह्मणतात. प्यादा मेला असतां जीवंत होत नाहीं कायम राहिला तर त्याचे योगानें मोहरा जीवंत होतो.

### सारांश.

राजे मरत नाहींत. मोहरीं मरतात व जीवंत होतात, प्यादीं मरतात व जीवंत होत नाहींत.

## खेळांत बहुतकरून येणारे शब्द.

### पेंच.

क्लृप्तीनें खेळणें ह्मणजे संधि आली असतां मोहरा अथवा प्यादा बिनजोरी फुकट मरायास देऊन खेळणारास तो घेण्याची लालूच उत्पन्न करतात आणि तेणेंकरून राजा उघडा करून फुकट गेलेल्या मोहऱ्याबद्दल अथवा प्याद्याबद्दल दुसरा मोहरा अथवा प्यादा कमवितात. डावांत पुष्कळ तऱ्हेचे पेंच येतात ते वेळानुसार ज्यास सुचतील तो पेंचानें खेळेल नाहीं तर चालीचें खेळेल. पेंचानें खेळून तो साधला तर बरें. फसला तर पेंच अंगावर आला असें ह्मणतात.

### डाव.

डाव शब्द पुष्कळ प्रकारानें उपयोगांत येतो. डाव सुरू करा

ह्मणजे खेळण्यास आरंभ करा.आतां कोणाचा डाव आहे ह्मणजे कोणाची खेळण्याची पाळी किंवा हात आहे. या डावाची घडी चांगली बसली नाहीं ह्मणजे डाव सुरू झाल्यावर कांहीं वेळानें मोहरीं वगैरे ज्या रीतीनें जमावींत त्या रीतीनें जमलीं नाहींत. हा डाव फार कठिण आला ह्मणजे एकानें पाळीनें खेळलेला डाव असा नुकसान करणारा असतो कीं, तोंड करून बचावतां येत नाहीं. कोणाचा डाव कोणावर झाला ह्मणजे डाव सुरू होऊन शेवट होतो व एक खेळणारा हरतो ह्मणजे डाव खातो. बत्तीस बुद्धिबलांसही डाव ह्मणतात ह्मणजे बुद्धिबलाचा एक डाव विकत आणा.

डाव आरंभ होऊन शेवट होणें याबद्दल वर्णन पुढें येईल. (प्रकरण नं० ६ व ७ पहा.)

## चूक.

दुरूक शहानें ( ज्यास दुर्कांत मोहरें जाणें ह्मणतात ) मोहरें जातें शहानें मोहरें जातें, दुजोऱ्यांत वगैरे मोहरें जातें, इरेस सांपडून मोहरें जातें वगैरे नुकसान होणारे डावाचा विचार न करतां भलताच डाव खेळला आणि नुकसान झालें ह्मणजे यास चूक ह्मणतात. पेंचानें खेळून डाव फसला तर चूक ह्मणत नाहींत. खेळण्यांत चुकीचे डाव फार करून असतात. त्यांतील चूक एकमेकांच्या खेळण्यावरून समजतें.

चूक शब्द डावाचे अखेरीस बोलण्यांत येतो. जसें डाव बरोबरीचा असतां एकावर डाव झाला ह्मणजे ह्मणतात कीं, चूक कोठें लागली हें समजत नाहीं, तो जसें सगळे डाव पाहून खेळतो तसें आपण पाहून खेळत नाहीं ही आपली मोठी चूक आहे.

## माज अथवा माजणें.

डावाचे अखेरीस एकच राहिलेला मोहरा दुसऱ्याचा मोठा* डाव होऊं नये ह्मणून जे सांपडेल ते मारीत सुटतो असें झालें ह्मणजे यास माजणें ह्मणतात. डावाचे शेवटीं शेवटीं एकाचा एकच राहिलेला मोहरा आतां माज करील असें ह्मणतात.

उंट व घोडा हे माजले असतां आकळले जातात परंतु हत्ती व वजीर माजले असतां आकळण्यास फार कठीण जातात. ते मोकळे झाले कीं मरेपर्यंत राजास शह देतात.

## गलगुटावन अथवा पकड.

कोणताही माजलेला मोहरा अडकाऊन इरेस ठेवणें व सोडणें अगर माजलेल्या मोहऱ्याच्या रंगाचा राजा माजलेल्या मोहऱ्यास माजूं न देण्यास आड आणणें मग तो कसाही अडकवावा.

या प्रमाणें पहिल्या प्रकरणांत केलेल्या दिग्दर्शनाचें विस्तारें करून वर्णन या प्रकरणांत केलें आहे तेणें करून पटाच्या घरांच्या गणतीची, मोहऱ्याच्या व प्याद्यांच्या गतीची. व्याख्यांचीं आणि शब्दांची माहिती खेळणारास पुष्कळच होईल. आरंभापासून शेवटपर्यंत दिलेले डावांत याखेरीज राहिलेली किरकोळ माहिती व शब्द खेळणाराचे समजण्यांत येतील.

---

* प्रकरण ७ पहा.

# प्रकरण ३.

## मोहरीं व प्यादीं यांची योग्यता.

### मोहरीं.

#### राजा.

राजा हें मुख्य मोहरें आहे.

#### वजीर.

वजीर अतिश्रेष्ठ, प्रमुख व कर्तबगारीचें मोहरें आहे.

#### हत्ती.

हत्ती वजिरापेक्षां कमी आणि उंट घोड्यापेक्षां ज्यास्त प्रतीचे मोहरें आहे.

#### घोडा.

घोडा उंटापेक्षा सरस मोहरें आहे.

#### उंट.

उंट सर्व मोहऱ्यांत कनिष्ठ प्रतीचें मोहरें आहे.

#### प्यादीं.

प्याद्यांची योग्यता मोहऱ्यापेक्षां कमी आहे.



# प्रकरण ४.

## दोन्ही रंगांच्या मोहऱ्यांचें व प्याद्यांचें एकमेकांशीं परिमाण.

### राजे.

दोन्ही रंगांचे राजे अगदीं बरोबरीचे आहेत.

### वजीर.

दोन्ही रंगांचे वजीर अगदीं बरोबरीचे आहेत ते दोन्हीही एकमेकांचे मेले असतां कोणत्याही रंगाचें नुकसान नाहीं. परंतु दुसऱ्या मोहऱ्याच्या अथवा प्याद्याच्या मोबदल्यानें मेले तर नुकसास आहे.

### हत्ती.

दोन्ही रंगांचें हत्ती अगदीं बरोबरीचे आहेत ते एकमेकानें मेले असतां कोणाचेंही नुकसान नाहीं परंतु उंट घोडा व प्यादा यांच्या मोबदल्यानें मेले असतां नुकसान आहे.

### घोडा.

दोन्ही रंगांचें घोडे अगदीं बरोबरीचे आहेत ते एकमेकांनीं मेले असतां नुकसान नाहीं, परंतु उंटाच्या मोबदल्यानें मेले असतां क्वचित् एकादेवेळेस थोडेसें नुकसान होतें आणि प्याद्याच्या मोबदल्यानें मेले असतां नुकसान आहे.

### उंट.

दोन्ही रंगांचें उंट अगदीं बरोबरीचे आहेत. ते दोन्ही पक्षांचे मेले असतां नुकसान नाहीं. परंतु प्याद्याच्या मोबदल्यानें मेले असतां नुकसान आहे.

### प्यादीं.

प्याद्यानें प्यादा मेला तर नुकसान नाहीं, प्याद्याच्या मोबदल्यानें कोणताही मोहरा मेला तर फायदा आहे. पुढील प्रकरणांत याच प्रकरणाचें विशेष वर्णन केलें आहे.

---

## प्रकरण ५.

## दोन्ही रंगांच्या मोहऱ्यांचें व प्याद्यांचें एकमेकांशीं परिमाण.

### परिस्फुटता.

### राजे.

दोन्ही रंगांचे राजे अगदीं बरोबरीचे खरे परंतु डावाचे शेवटीं दोघांची स्थिति सारखीच राहत नाहीं. एकाचें नुकसान होतें क्वचित् सारखी स्थिति राहते.

### वजीर.

दोन्ही रंगांचें वजीर अगदीं बरोबरीचे आहेत ते एकमेकांचे मेले असतां नुकसान नाहीं खरें. परंतु वजिरास वजीर होऊं नये अशा तऱ्हेनें खेळतात आणि आपला वजीर न जाऊं देतां दुसऱ्याचा वजीर अन्य मोहऱ्यांनीं वगैरे मिळावा ह्मणून प्रयत्न करतात तो असा कीं त्याबद्दल दोन लहान मोठीं मोहरीं खर्ची घालण्यास तयार होतात.

दोन मोहरीं मिळतांतें तरी कोणी वजीर देत नाहींत, निरुपाय झाला तर मात्र तो देणें भाग पडतो. तीन मोहरीं मिळाल्यास खुशीनें वजीर देतात. कधीं कधीं दोन हत्ती मिळाल्यासही तो खुशीनें देतात. खोटा डाव खेळून जर चूकीनें वजीर फुकट गेला तर मात्र उपाय नाहीं. वजीर त्यापेक्षां हलक्या मोहऱ्याच्या अथवा प्याद्याच्या मोबदल्यानें मेला तर खेळणारावर तो डाव होण्याचा संभव आहे. डावांत दोन्ही वजीर मेले असतां डाव रंडका झाला ह्मणतात. कोणताही मोहरा अथवा प्यादा जोरांत वजीरावर आला तर तो त्याचे माऱ्यांतून काढणें भाग पडतें.

## हत्ती.

दोन्हीं रंगांचे हत्ती एकमेकानीं मेले असतां नुकसान नाहीं. ते एकमेकांनीं मरूं नयेत असा कोणी प्रयत्न करीत नाहीं. फक्त लहान मोहऱ्यानें व प्याद्यानें मरूं नयेत म्हणून फार जपतात. हत्ती वजीर मारण्यास इतर मोहऱ्यापेक्षां फार उपयोगीं पडतो. दोन लहान मोहरीं मिळत असल्यास हत्ती खुशीनें देतात. हत्तीला मारण्यास वजीर आला असतां जोर केला म्हणजे त्यास त्यापासून बिलकूल भय नाहीं. परंतु उंट, घोडा व प्यादा त्यावर आले तर जोर असला तरी त्यांचे माऱ्यांतून तो काढला पाहिजे.

## घोडे.

दोन्ही रंगांचे घोडे एकमेकानीं अथवा उंटानें मेले असतां नुकसान नाहीं. फक्त प्याद्याखालीं मरूं नयेत. डावाचे अखेरीस एकाचा एकच

घोडा व एकच उंट राहिला आणि दुसऱ्याचाहि एकच घोडा व एकच उंट राहिला आणि उंट घोडा जालें तर घोडा मरणाराचें थोडें नुकसान होतें. कारण घोडा पटाचे सर्व घरांत जातो तसा उंट जात नाहीं. घोडा वजीर व हत्ती मारण्यास आला तर ते त्याचे माऱ्यांतून काढले पाहिजेत. घोड्यास अष्टपैलू मोहरें ह्मणतात. कारण तो पटाचे मधें असला तर आठ घरें धरितो. तो जोरांत असतां त्यावर कोणताही मोहरा आला तरी त्यापासून त्यास भय नाहीं. फक्त त्यावर प्यादा आला तर मात्र तो काढावा लागतो.

## उंट.

दोन्ही रंगांचे उंट एकमेकांनीं अथवा घोड्यांनीं मेले असतां नुकसान नाहीं. फक्त प्याद्याखालीं मरूं देऊं नयेत. उंट वजीर व हत्ती वगैरे इरेस धरण्यास फार उपयोगीं पडतात.

## प्यादीं.

प्याद्यानें प्यादा मेला तर नुकसान नाहीं, परंतु वजीर व हत्ती ह्यांचे पुढचीं प्यादीं मेलीं तर थोडेंसें नुकसान होतें. याजकरतां तीं तशींच राहावींत म्हणून प्याद्यास प्याद्याचा जोर घालतात. कदाचित् तीं मेलीं तर त्या ऐवजीं दुसरीं प्यादीं, वजीर व हत्तीचीं होतात.

प्याद्याखालीं मोहरा मिळाला तर फायदा खरा, पण तो मिळून दोहोंपेक्षां ज्यास्त प्यादीं गेलीं तर नुकसान आहे.

दोहोंपेक्षां ज्यास्त प्यादीं मिळत असलीं तर खेळणार मुद्दाम प्याद्याखालीं मोहरा मरावयास देतात.

---

## प्रकरण ६.

### डावाचा मूळारंभ.

उभयतां खेळणारांनीं एक एक रंग घेऊन सांगितल्याप्रमाणें मोहरीं व प्यादीं मांडावींत, आणि दोघांपैकीं एकानें खेळण्यास प्रथम आरंभ करावा व दुसऱ्यानें नंतर आरंभ करावा.

तांबडा अथवा हिरवा रंग कोणी घ्यावा याबद्दल कांहीं नियम नाहीं. उभयतां खेळणारांनीं एकमेकाचे विचारानें कोणताही एक रंग घ्यावा, अगर विचारपूस न करतां तांबडा अथवा हिरवा रंग घेऊन एकानें बुद्धिबळें मांडण्यास आरंभ केला कीं लगेच दुसऱ्यानें राहिलेला रंग घेऊन मांडण्यास सुरवात करावी.

गंजिफांत, सोंगट्यांत व क्याटांत पहिल्यानें कोणी खेळावें याबद्दल जसा नियम आहे, तसा बुद्धिबळांत प्रथम कोणी खेळावें याबद्दल कांहीं नियम नाहीं. कोणी तरी एकानें एकमेकाचें विचारानें प्रथम खेळण्यास आरंभ करावा, नंतर दुसऱ्यानें खेळावें.

आरंभ करण्याच्या रिती तीनचार तऱ्हेच्या आहेत, कोणी एक, कोणी पांच, कोणी सहा व कोणी चार डाव टाकतात, आपल्यांत फार करून चार डाव टाकण्याची वहिवाट आहे, म्हणून प्रथम खे-

ळणारानें आरंभीं चार बुद्धिबलांनीं चार डाव टाकावेत, नंतर दुसऱ्या खेळणारानेंही तसेच चार टाकावे. दोघांनीं चार चार डाव टाकल्यानंतर प्रथम खेळणारानें एकच हवा तो डाव खेळावा. तसाच दुसऱ्या खेळणारानेंही एकच हवा तो डाव खेळावा, असा पाळीपाळीनें एक एक डाव, डाव संपे तोंपर्यंत उभयतांनीं खेळावा. डावाचा निकाल होऊन कोणाचा कोणावर डाव झाला नाहीं तर पहिल्या खेळणारानें पुढचे डावीं प्रथम खेळावें. डाव झाला तर ज्याचा डाव झाला असेल त्यानें पुढचे डावीं पहिल्यानें खेळावें. प्रथम खेळणें थोडेंसें फायदेशीर आहे.

खेळणारानें चार डाव टाकते वेळीं पक्कें समजलें पाहिजे कीं, घोड्याखेरीज कोणतेंही मोहरें प्यादीं सरकावल्यावांचून खेळतां येत नाहीं, येवढ्याकरतां पहिल्या चार डावांत निदान दोन प्यादीं सरकवून मोहरीं बाहेर पडण्यास रस्ता खुला करावा आणि पुढच्या एक एक हातानें एक एक मोहरें काढून डाव जमवावा.

खेळणारानें चार चार डाव अमुकच टाकावेंत असा कांहीं नियम नाहीं, खुशीस वाटेल ते चार डाव फायदेशीर टाकावेत.

पहिले चार डाव टाकते वेळेस शह येईल असें खेळूं नये, शह येईल असेंच खेळणारा खेळला आणि शह आला तर पांचव्या हातानें नाशह होईल असेंच खेळलें पाहिजे. पांचव्या हातानें हवा तो डाव खेळतां येणार नाहीं.



# प्रकरण ७.

## डावाचा शेवट.

डावाचा शेवट दोन प्रकारांनीं होतो.

## प्रकार १.

उभयतां खेळणारांनीं प्रथम चार चार डाव टाकून पाळीपाळीनें खेळत असतां ज्याच्या राजास नाशह करण्यास जागा राहत नाहीं अगर ज्याचें राजाखेरीज कोणतेंही मोहरें राहत नाहीं, त्यावर डाव झाला असें समजावें. त्या डावाचीं नांवें, बुर्जी, मात, प्यादीं किंवा प्यादेंमात.

## बुर्जी.

एकाचा राजा व एकादें मोहरें किंवा कांहीं मोहरीं आणि दुसऱ्याचा फक्त राजा, अशी डावाची स्थिती झाली असतां, मग दोघांचीं प्यादीं कितीही असोत अथवा नसोत, ज्याचा नुसता राजा असेल त्यावर बुर्जीचा डाव झाला असें म्हणतात. बुर्जी हा सर्वांत लहान डाव समजतात.

## मात.

कोणत्याही राजास फक्त मोहऱ्याचा शह आला असतां कोणत्याही तऱ्हेनें नाशह करतां आला नाहीं ह्मणजे त्यास मात म्हणतात.

मात होतेवेळेस दोनही रंगांची मोहरीं जिवंत असलीं पाहिजेत, मग तीं एकमेकाचीं कितीही असोत. मातेच्या हजारो तऱ्हा आहेत, परंतु त्यांस निरनिराळीं नांवें नाहींत. कोणत्याही मोहऱ्यानें शह बसून कोणतेही घरीं कोणतीही मात होवो त्या सर्वांस मातच ह्मणतात. एका तऱ्हेची मात होते तिला मारमात म्हणतात. मातेचा डाव बुर्जीपेक्षां मोठा समजतात.

## मारमात.

कोणत्याही रंगाचा एकच राहिलेला मोहरा शहानें मेला असतां नाशह करण्यास जागा आहे तर ती नुसती बुर्जी होते, पण तो मोहरा शहानें मेला असतां नाशह करण्यास जागा नाहीं तर त्यास मारमात ह्मणतात, ह्मणजे एकाच हातानें बुर्जी होते व मातही होते. हा डाव बुर्जीपेक्षां ज्यास्त आणि मातेपेक्षां कमी समजतात.

## प्यादी किंवा प्यादेंमात.

प्याद्याचाच शह येऊन नाशह करण्यास जागा नसली ह्मणजे त्यास प्यादी किंवा प्यादेंमात ह्मणतात.

प्यादी होते वेळेस दोनही रंगांचीं मोहरीं जिवंत असलीं पाहिजेत. मग तीं एकमेकांचीं कितीही असोत. मातेच्या तऱ्हा जशा पुष्कळ आहेत तशा प्याद्याही पुष्कळ तऱ्हेच्या आहेत. पैकीं एकदोन प्याद्यांस हुचमह्ली व घोडमह्ली अशीं नांवें आहेत. ह्या प्याद्या कोणी कोणी श्रेष्ठ मानल्या आहेत.

कोणत्याही ठिकाणीं कोणत्याही प्याद्यानें कोणत्याही राजावर प्यादी झाली असतां ती साधी अथवा नसती " प्यादी " म्हणतात, मग दोन्ही रंगांचीं मोहरीं कितीही असोत, परंतु हुचमह्ली व घोडमह्ली ह्या प्याद्या नियमित आहेत, घोड्याचेंच प्यादें, प्यादी होणारा राजा कोणत्याही कोपऱ्याचे घरांत, दुसरा राजा, कोपऱ्याचे राजाच्या उंटाच्या अगर त्याचे वजिराच्या उंटाच्या दुसरे घरांत*, एक एकाचा एक एक बेपगी उंट हुचमह्ली होण्याचा, अथवा एक एक घोडा, व प्याद्याचा शह राजाच्या अथवा वजिराच्या घोड्याच्या साहवे घरांत आला आणि नाशहाला जागा नाहीं तर उंट उंट असले तर हुचमह्ली व घोडा घोडा असले तर घोडमह्ली असें म्हणतात. हुचमह्ली होते वेळेस दोघांचा एक एक उंट दोघांचे राजे, डाव करणाराचें एक प्यादें अशीं एकंदर पांच बुद्धिबळें असलीं पाहिजेत. दुसरें कोणतेंही मोहरें अथवा प्यादें असूं नये. तसेच घोडमह्लीच्या वेळेसही कोणतींही मोहरीं अथवा प्यादीं असूं नयेत.

दोघांचा एक एक हत्ती राहून प्यादी झाली तर त्यास गजमह्ली, आणि दोघांचे वजीर राहून प्यादी झाली तर त्यास फकेरी, किंवा परमहौंसी कोठें कोठें म्हणतात. ह्या प्याद्या हुचमह्ली व घोडमह्लीसारख्याच नियमित असून फार कठीण आहेत.

प्यादीचा डाव बुर्जी व मात यांपेक्षा मोठा समजतात. प्यादीमात होण्याची आणखी एक तऱ्हा आहे तीस मारप्यादी म्हणतात.

---

* परिभाषा पहा प्रकरण १४.

## मारप्यादी.

डावाच्या शेवटीं एकाचा एकच राहिलेला मोहरा प्याद्यानें मरून शह बसला आणि नाशहास जागा नाहीं तर त्यास मारप्यादी ह्मणतात ह्मणजे त्याच डावास बुर्जी होऊन प्यादेमातही होते. ह्या डावाची लहान डावांत गणना करण्याचा समज आहे.

डावाचा शेवट.

# प्रकार २.

बुर्जी मात आणि प्यादी वगैरे पैकीं कोणताही डाव झाला असतां डावाचा शेवट होतो, परंतु त्यांपैकीं कोणताही डाव न होतां डावाचा शेवट झाला तर त्यास बरोबरी म्हणतात.

बरोबरी पुष्कळ प्रकारांनीं होते. ती अशी कीं, दोघांचीं एक एक सारखींच मोहरीं राहिलीं आणि दुसरें कांहीं एक राहिलें नाहीं तर कोणाचाही कोणावर कोणताही डाव होण्याचा संभव नाहीं म्हणजे वजिरास वजीर, हत्तीस हत्ती, घोड्यास घोडा व उंटास उंट, असें शेवटीं राहिलें, आणि प्यादीं कोणाचींही नाहींत, तर कांहींच होणें नाहीं, म्हणून बरोबरी समजून डाव टाकतात.

एकाचा वजीर व दुसऱ्याचा हत्ती, एकाचा हत्ती व दुसऱ्याचा घोडा अगर उंट, असें राहिलें तरी बरोबरी होते. अशी वर सांगितलेली बरोबरी होण्यास डावाची स्थिति जशी असावी तशी असली पाहिजे. नाहींतर बरोबरी न होतां बुर्जी किंवा मात होईल.

एकाचीं घोडा व उंट दोनच मोहरीं, दुसऱ्याचें घोडा अगर उंट एकच मोहरें, कोणाचेच दुसरें कांहींएक नाहीं असा डाव शेवटीं राहिला तर कोणाच्यानें कोणताही डाव होण्याचा संभव नाहीं, म्हणून बरोबरी समजून डाव टाकतात. अशा डावास पंच मोहरी म्हणतात.

एकाचा घोडा व उंट, व दुसऱ्याचें घोडा व उंटापैकीं एकच मोहरें ह्यांनीं एकमेकांवर खऱ्या रीतीनें मागें सांगितलेल्या डावापैकीं कोणताही डाव होणार नाहीं असें समजून बरोबरीचा डाव टाकतात खरें, परंतु त्या लहान मोहऱ्याच्या ऐवजीं जर वजीर अगर हत्ती असेल तर डाव होण्याचा संभव आहे. परंतु तीं पंच मोहरी असें समजून बरोबरीचाच डाव टाकण्याची वहिवाट आहे.

एकाचा वजीर अथवा हत्ती असून दुसऱ्याचीं किरकोळ दोन मोहरीं बिनजोरी इरेंत एक व राजाचे माऱ्यांत एक जर आहेत आणि ज्याचा वजीर अथवा हत्ती आहे त्याची खेळण्याची पाळी आहे तर तो बिनजोरी मोहरें शहानें मारून दुसरा राजानें मारील आणि पंच मोहरी न होऊं देतां बुर्जी करील. याचप्रमाणें पंच मोहरी असतां मातही होते. शेवटीं पांच मोहरीं राहून जर बुर्जी किंवा मात झाली तर त्यास पंच मोहरी न म्हणतां डाव झाला असें म्हणतात.

ज्याचा डाव कमी तो आपणावर डाव होऊं नये म्हणून पंच मोहरीचा घाट घालतो. आणि अशा तऱ्हेनें पंच मोहरी करतो कीं दुसऱ्यास खेळण्याचा हक्क राहत नाहीं, जसें एकाचा हत्ती व वजीर आणि दुसऱ्याचे दोन हत्ती आहेत तर नुसते हत्ती असणारावर डाव होण्या-

चा संभव आहे म्हणून तो आपला एक हत्ती पाळी आल्यावर मुद्दाम मरण्याकरतां शहाशहानें माजवितो. तो मेला कीं पांच मोहरीं राहतात. पुढें खेळणें बंद होतें, पंच मोहरी अगदीं निर्दोष झाली पाहिजे. शह शह किंवा मारामारी अगदीं नसावी.

दोघांचीं लहान मोठीं मिळून चार मोहरीं व लहान मोहऱ्यास प्याद्याचा जोर असून त्याचा एकच हातास मोहरा होणार असें जर आहे आणि शह येतां येतां होणारा मोहरा इरेस आला तर पांच मोहरीं होतात, पण ह्यास पंच मोहरी म्हणत नाहींत. कारण शह देणाराचा शह देण्याचा अगर दुसरा डाव खेळण्याचा हक्क राहतो, म्हणून तो शह अथवा दुसरा डाव खेळून झाली तर बुर्जी किंवा मात करील. होणारा मोहरा इरेस येण्याबरोबर शह बंद झाला कीं पंच मोहरी झाली असें समजावें.

अशा तऱ्हेनें मोहरा इरेस येऊन पंच मोहरी झाली असतां हक्क राहिल्यास एकच हात खेळावा, परंतु शह शह देऊं असें म्हणतात ही गोष्ट वादग्रस्त आहे.

दोघांचीं लहान मोठीं मिळून चार मोहरीं आहेत आणि ज्याचा मोठा मोहरा आहे त्याचे वजीर किंवा राजाचें प्यादें वजीर होण्यास अगदीं तयार आहे आणि तो झाला तर पंचमोहरी होतें ती न व्हावी म्हणून तो आपला मोहरा मरावयास देतो, नवा मोहरा झाला कीं, पुन्हां चारचीं चारच मोहरीं राहतात. चार मोहरीं राहिलीं असतां डाव सुरूं असतो. एवढेंच कीं डाव होण्याचा संभव मात्र पाहिजे. नसेल तर बरोबरी टाकतात.

पंचमोहरी मोठी वादग्रस्त गोष्ट आहे. खेळणार कधीं कधीं पंच-मोहरी म्हणून डाव टाकतात व कधीं कधीं ती झाली असतां हीं शह देण्याचा हक्क दाखवून शह देत बसतात व शह बंद होईल तेव्हां पंच मोहरी ह्मणतात. पंच मोहरींत ज्याचे वजीर व हत्ती आहेत आणि पंच मोहरी होण्याबरोबर त्याची खेळण्याची पाळी नसेल तर मात्र पंचमोहरी कबूल करतात आणि खेळण्याची पाळी असेल तर पंचमोहरी कबूल करीत नाहींत. कारण आमची खेळण्याची पाळी आहे सबब शह शह देऊन झाली तर बुर्जी किंवा मात करूं, मग यास कितीही हात लागोत असें ते म्हणतात. पंच मोहरींत अमुकच मोहरीं असलीं तर ती पंच मोहरी आणि अमुकच मोहरीं असलीं तर ती पंचमोहरी न समजतां डाव पुढें चालवावा असा कांहीं एक निर्बंध नाहीं. कोणतींही पांच मोहरीं राहिलीं कीं ती पंच मोहरी समजून डाव बरोबरीचा टाकावा. पंचमोहरींत वजीर नसेल तर बहुतकरून तसेंच करतात. पंच मोहरींत वजीर व हत्ती आहेत आणि खेळण्याची पाळी आहे या नात्यानें शेंपन्नास शह देण्याचा हक्क राहत नाहीं. कारण पंच-मोहरी बरोबरीचा डाव झाला असतांना पुढें चालवावा हें प्रशस्त दिसत नाहीं. हत्ती व वजीर आहेत म्हणूनच डाव होण्याचा संभव दिसतो खरा, पण तो फायदा एकच मोहरें राहणारास दिला पाहिजे.

पंचमोहरी होण्याबरोबर जशी बुर्जी किंवा मात होते तसेंच एक दोन हातानेंच शहानें आणि मारण्यानें बुर्जी किंवा मात पंच मोहरी होण्याबरोबर होत असली तर करावी, नाहीं तर शह देत बसणें अप्रशस्त आहेसें दिसतें.

कोणत्याही राजास शह आले असतां कोणत्याही तऱ्हेनें ते चुकवतां येत नाहींत तर शह शह झाले असें समजून बरोबरीचा डाव टाकतात. ज्याचा डाव अगदीं कमी असेल तो आपणावर कोणताही डाव होऊं नये म्हणून शह शह करण्याचा घाट घालून डाव बरोबरीवर नेतो.

एकाचा राजा दुसऱ्याच्या राजानें व मोहऱ्यांनीं अगदीं कोंडला जाऊन त्यावर एक दोन हातांनीं प्यादी होणार, परंतु त्याचा माजलेला मोहरा ( उंट किंवा घोडा ) ती होऊं देत नाहीं, तो इरेस घेऊन प्यादी करावी असा दुसऱ्याचा प्रयत्न असतो. इरेस कोठें घ्यावा व कसा घ्यावा हें न पाहतां एकदम तो शहानें इरेस घेतला असतां उलटा त्याचा जर शह आला तर इरेस घेणारास त्याचा नाशह करणें भाग आहे म्हणून विसरभोळ्या रीतीनें असें स्थळांतर करतो कीं कोंडलेल्या राजास पाळीचा हात खेळण्यास घर राहत नाहीं, इरेस सांपडलेला मोहरा खेळतां येत नाहीं, व डावाचाही निकाल नाहीं म्हणून डाव टाकतात अशा डावास कुजी म्हणतात.

एका रंगाचा नुसता मोहरा असून तो इरेस सांपडला आणि त्याच्या रंगाचे राजास पाळी आली असतां खेळण्यास घर नाहीं तर कुजी ह्मणून डाव बरोबरीचा टाकतात असा डाव क्वचित् होतो.

# प्रकरण ८.

## डावाची मध्य अवस्था.

डावाची मध्य अवस्था ह्मटली ह्मणजे एवढीच कीं, उभयतां खेळणारांचे मुळारंभीं चार चार डाव पडल्यानंतर पांचवे हातापासून तों खेळ संपेपर्यंत उभयतांच्या डावाची जी स्थिति असते ती, मग तो खेळ कोणत्याही तऱ्हेनें व कितीही हातानें संपो.

उभयतां खेळणार एकमेकावर बुर्जी वगैरेपैकीं कोणता तरी डाव व्हावा ह्मणून जसें सुचेल तसें खेळतात. दोघांचें खेळणें सारखें होत नाहीं व होणारही नाहीं; ह्मणून दोघांचे डावाची मध्य स्थिति प्रत्येक डावांत अगदीं निरनिराळी होऊन जाते. ती अशीं कीं, प्रथम खेळणाराचे पहिले चार डाव पडले कीं, त्या डावाचे धोरणानें दुसरा पहिले चार डाव टाकतो, नंतर प्रथम खेळणारा पांचवे हातापासून साधक बाधक पाहून आपलीं मोहरीं व प्यादीं, मारामारी करून, इरेस धरून अथवा घालून, शह देऊन, जोर करून, अगर कांहीं एक न करतां येरव्हीच, बाहेर काढतो व खेळतो, तसाच दुसरा खेळणारही आपलीं मोहरीं व प्यादीं साधक बाधक पाहून खेळतो. असा खेळ चालला असतां दोघांचीं मोहरीं व प्यादीं उभ्या व आडव्या पट्टींच्या घरांत येतात. असें खेळतां खेळतां मोहरीं व प्यादीं नेमके घरांत आलीं ह्मणजे एकाच्या ह्मणा अगर दोघांच्याही ह्मणा डावाचे मध्य स्थितीला कांहीं प्रकारचें कांहीं वेळ स्वरूप येत जातें. तें दोघांचे डावाची स्थिति पाहिली असतां अगदीं निरनिराळें असतें. क-

चित् सारखें असतें. त्या स्वरूपास डाव जमाविणें, भांडणाचें तोंड उत्पन्न करणें, खिट्टी बसणें, डाव विचकणें, डाव फुटणें, डाव फोडणें, हल्ला करणें, डाव चढा होणें, डाव बचावणें, मोहरीं जीवंत करणें असें ह्मणतात.

## डाव जमाविणें.

उभयतां खेळणारांचे चार चार डाव पडल्यानंतर पांचव्या हातापासूनच मारामारी न करितां ते आपआपलीं सगळीं मोहरीं जंगजोडीनें बाहेर काढून कोट अगर व्यूह बांधतात आणि राजा सुस्थळीं सुरक्षीत नेतात. अशा डावास डाव जमाविणें ह्मणतात.

मोहरीं जशीं निघावीत तशीं निघालीं नाहींत व राजासही हिसका बसला (सुस्थळीं जातां न येणें) आणि डाव अंगावर येत चालला ह्मणजे डाव चांगला जमला नाहीं असें ह्मणतात.

## भांडणाचें तोंड उत्पन्न करणें.

डाव जमल्यावर राजा ज्या बाजूला गेला असेल त्या बाजूकडे अथवा जवळ आसपास मारामारी होऊन राजाचा कोट फुटावा ह्मणून प्याद्यावर अथवा मोहऱ्यावर मोहरीं व प्यादीं अशा रीतीनें देतात कीं, मारामारी केल्यावांचून कोणताही उपाय नाहीं. यास भांडणाचें तोंड उत्पन्न करणें ह्मणतात.

दुसऱ्याचे डावांत आपलीं मोहरीं शिरावीत अगर त्यांच्याकरितां घरें खुलीं व्हावींत ह्मणून भांडणाचें तोंड पाहिजे त्या ठिकाणीं उत्पन्न करतात.

## खिट्टी बसणें.

प्याद्यावर प्यादें प्याद्याच्या जोरांत आलें तर तें न मारतां प्याद्याच्याच जोरांत पुढें सारणें यास खिट्टी ह्मणतात.

दोन दोन अथवा कितीही प्याद्यांच्या खिट्या डावांत जागोजाग बसल्या ह्मणजे मोहऱ्यांच्या गतीला अवरोध होतो ह्मणून मोहरीं देऊन खिट्या मोडाव्या लागतात. डावाच्या शेवटीं शेवटीं खिट्या कोणास साधक व कोणास बाधक होतात.

## डाव विचकणें.

मुख्यत्वें करून हत्तींचें अथवा घोड्याचें कोणत्याही बाजूचें प्यादें मारामारी होऊन दुसऱ्या पट्टींत पडलें अगर तीं दोन्हीही प्यादीं एक एक घर पुढें सरकलीं कीं, यास डाव विचकणें ह्मणतात.

घोड्याचें प्यादें जागचे जागींच राहून हत्तीचें प्यादें एकच घर सरकावलें तर यास विचकणें ह्मणत नाहींत व या बाजूला फार करून राजा आडीच घरें टाकतात, राजा गेल्यावर या प्याद्यांच्या योगानें त्याचा चांगल्या रीतीनें बचाव होतो ह्मणून तीं प्यादीं खेळणारानें विचकूं नयेत व विचकूं देऊं नयेत.

विचकलेल्या बाजूला राजा जाण्याचा विचार केला तर फाटक्यांत राजा जाऊन निभाव लागणार नाहीं असें ह्मणतात, आणि चांगल्या बाजूला तो नेतात अगर निरुपायामुळें विचकलेल्या बाजूला जातात.

बाकी राहिलेलीं चार प्यादीं मारामारी होऊन दुसऱ्या पट्टींत प-

डलीं अगर पुढें सरकावलीं तर यास डाव विचकणें ह्मणत नाहींत. राजा व वजीर यांचीं प्यादीं मारामारी होऊन दुसरे पट्टींत पडलीं तर तीं प्यादीं बिघडलीं असें ह्मणतात.

विचकलेल्या डावांत एकमेकांचीं मोहरीं एकमेकांच्या डावांत शिरकण्यास फार सुलभ जातें, कारण प्यादीं विसकळीत झाल्यामुळें पट्ट्या रिकाम्या होतात ह्मणून त्यांच्या गतीला कांहीं अवरोध होत नाहीं.

## डाव फुटणें.

डाव फुटणें फार करून डाव विचकण्या जवळ जवळच आहे. एवढेंच कीं, प्यादीं व मोहरीं जंगजोडीनें चांगलीं जमलीं असतां त्या बाजूला राजा अडीच घरें जाणार ह्मणून कांहीं तरी हरकत करून तो जमलेला डाव विसकळींत करून टाकणें, अगर मुळींच तो गेला असेल तर भांडणाचें तोंड उत्पन्न करून मारामारी करून तो उघडा करणें ह्मणजे यांस डाव फुटणें ह्मणतात. ज्या बाजूला डाव फुटला असेल त्या बाजूला कोणी राजा नेला तर, केवढी तुमची छाती फुटक्यांत राजा आणलांत, असें ह्मणतात.

## डाव फोडणें.

राजा अडीच घरें जातात तो ज्या बाजूला प्याद्यांचें चांगलें संरक्षण व ज्या बाजूला डाव लवकर फुटणार नाहीं त्या बाजूलाच तो अडीच घरें नेतात.

राजा अडीच घरें गेल्या नंतर राजाज्या बाजूचा अगदीं विचका व्हावा, तो चांगला उघडा व्हावा, व राजा जवळची प्यादीं मारामारीं

करून नाहींशीं व्हावींत, ह्मणून प्याद्यांची चाल करून त्यांचे अंगावर जातात, मारामारी होऊन राजा उघडा झाला तर बरें, खिट्टी बसली तर मोहरें देऊन तीं प्यादीं मारावींत, आणि राजा अगदीं उघडा करावा. यास डाव फोडणें ह्मणतात.

एकाचा राजा एका बाजूला गेला असतां त्याच बाजूला दुसऱ्याचा राजा न्या असें कोणी सांगितलें तर असें ह्मणतात कीं, त्या बाजूला राजा नेला असतां आपल्याला डाव फोडतां येणार नाहीं. डाव फोडण्याकरितां राजा न जातां डाव फोडण्याचे प्रयत्नास लागतात.

दोघांचे राजे जागचे जागींच असून एकाची एक बाजू फुटून विसखळीत झाली आहे, तर तो दुसऱ्या बाजूला राजा जाईल असें समजून दुसरा ह्मणतो कीं, या बाजूला डाव फुटलाच आहे, दुसरी बाजू फोडून टाकावी ह्मणजे तिकडेही त्यास राजा जातां येणार नाहीं.

डावांत खिट्ट्या बसल्या असतां मोहरें वगैरे आंत घुसण्याकरतां मोहरें देऊन कोठेंही डाव फोडतात.

## हल्ला करणें.

राजा अंडीच घरें सुरक्षित गेल्यावर उभयतां खेळणार एकमेकांचा डाव फोडण्याच्या अगर मोहरें मिळविण्याच्या प्रयत्नास लागतात ते असे कीं, प्यादीं सारून अगर मोहरें देऊन राजाजवळ मोहरीं एकदम लागू पडावींत असें खेळतात. असें करतां करतां एकाचा डाव कच्चा पडला ह्मणजे मोहरीं राजापासून लांब व तीं त्याच्या संरक्षणाकरतां येऊं शकत नाहींत. असें झालें कीं, मोहरा देऊन डाव फोडून बाकीचीं मोहरीं लागू करून राजास एकदम अथवा एक

दोन हातानीं पुढें कोणता तरी डाव होण्याचे ठिकाणीं नेतात. अशा रीतीनें कोणताही डाव एकदम झाला ह्मणजे त्यास हल्ला ह्मणतात. याप्रमाणेंच वजिरावर एका मागून एक मोहरीं येऊन जर तो मेला तर त्यास हल्ला ह्मणतात.

राजा जागचेजागींच अगर कोठेंही असला तरी हल्ला होण्याचा संभव आहे.

हल्ला होते वेळीं राजा व वजीर यांचीं मोहरीं कोणतेही तऱ्हेनें त्यांचा बचाव करूं शकत नाहींत.

हल्ला कोठें होईल व कोणत्या तऱ्हेनें होईल व तो प्रत्येक डावांत होईल कीं नाहीं हें सविस्तर सांगण्यास फार कठिण आहे.

हल्ला करण्याचा डाव आला असतां तो खेळणारांस समजला पाहिजे, न समजला तर हल्ला होण्याची वेळ फुकट जाते.

## डाव चढा होणें.

उभयतां खेळणार आपआपलीं प्यादीं व मोहरीं एकमेकांच्या डावांत घुसावींत असें खेळतात. परंतु ज्याचा डाव, मोहऱ्यावर प्याद्यांची लगट करून पुढें येऊं न देतां, त्यांस मागें मागें हटवीत जातो, तसेंच लहान मोहऱ्यांनीं मोठ्या मोहऱ्यांवर चाल करून त्यांचे अंगावर जाऊन त्यांची पिछेहाट करतो, असें करतां करतां लहान मोठें अथवा सबंध मोहरा अगर प्यादा कमवितो, असा डाव चढत चालला कीं, यास चढा अगर जबर डाव ह्मणतात.

चढा डाव झाला असतां नेहमीं चढाच राहील असा नियम नाहीं.

## डाव बचाविणें.

एकाचा डाव चढाई करून दुसऱ्याच्या डावांत शिरूं लागला कीं, दुसरा आपले डावाला, मागें मागें हटवून जपवेल तितकें जपत असतो, व जसें जसें आघात येत जातील ह्मणजे लहान मोठें गेलें, सबंध मोहरा गेला, दोन तीन प्यादीं गेलीं, तरी त्याला डोकें देऊन युक्तिप्रयुक्तीनें हल्ला करणारीं मोहरीं व डाव फोडणारीं प्यादीं मारून अगर खिट्ट्या घालून डावाचें चांगल्या रीतीनें संरक्षण करतो. यास डाव बचावणें असें ह्मणतात.

वेळेनुसार ज्याचा मोहरा गेला असेल तो आपणावर बुर्जी होईल असें न समजतां जपून जपून खेळतो ह्मणजे मारामारी न करतां उलटें तिचें तोंड चुकवून फायदा होईल, असें खेळतो असा बचावीत बसलेला डाव एकादे वेळेस चढा डाव होतो.

ज्याचा डाव हमेश बचावीतच बसलें पाहिजे त्याचा डाव जेर झाला असें ह्मणतात, फारच जेर झालेला डाव क्वचित् सुधारला जातो.

## मोहरीं जिवंत करणें.

मोहरीं जिवंत होण्यास साधन ह्मटलें ह्मणजे प्यादींच होत. ज्या मोहऱ्यापुढचें प्यादें ठिकाणापासून ( ठिकाण पहिलें घर समजावें ) सहा घरें जाऊन सातवे घरीं जाण्यास तयार झालें त्या सातवे घरांत त्या प्याद्याचा त्या घरचा मोहरा होतो, ह्मणजे राजा व वजीर यांचे पुढचीं प्यादीं सहा घरें पुढें गेलीं तर सातवे घरीं त्या दोनही प्याद्यांचा वजीर होतो, राजाचा प्यादा तितकीं घरें गेला असतां त्याचा राजा व्हावा तो होत नाहीं याचें कारण राजा मरत नाहीं ह्मणून

तो पुन्हां जिवंत न होतां त्याबद्दल वजीरच होतो, याचप्रमाणें उंट घोडें व हत्ती यांचे पुढचीं प्यादीं सहा घरें जाऊन सातवे घरीं जाण्यास तयार झालीं कीं, उंटाचे प्याद्याचे उंट घोड्याचे प्याद्यांचें घोडें व हत्तीच्या प्याद्यांचे हत्तीं होतात.

जें प्यादें मोहरें जिवंत होण्यास सहा घरे गेलें असेल आणि त्याचा सातवे घरीं होणारा मोहरा जिवंत असेल तर तें प्यादें तें मोहरें मरेपर्यंत तसेंच राहील, त्याचा होणारा मोहरा जर जिवंत राहिला तर त्या प्याद्याचा त्या मोहऱ्याचे संबंधानें कांहींही उपयोग नाहीं. ह्मणजे राजे वजीर उंट घोडें व हत्ती यांचीं प्यादीं जरी सहावे घरांत पोंचलीं तरी तें राजा खेरीज करून सर्व मेल्यावांचून त्या प्याद्यांचा कांहीं उपयोग नाहीं.

अशीं साहावे घरीं गेलेलीं प्यादीं निरर्थक होऊं नयेत व त्याचा ताबडतोब उपयोग व्हावा ह्मणून प्यादाचा जिवंत होणारा मोहरा कोणत्याही तऱ्हेनें खर्ची घालतात ह्मणजे त्या मोहऱ्याचे माऱ्यांत कांहींही असो तें मारून अगर जरूर असेल तेव्हां फुकट देऊन पुन्हां तोच मोहरा जिवंत करतात.

राजा, वजीर, उंट, घोडें व हत्ती यांच्या पुढचीं प्यादीं सहावे घरीं पोहोंचल्यावर त्यांचीं सातवे घरीं होणारीं मोहरीं मेलीं असलीं तर तीं तींच मोहरीं जिवंत होतात ह्मणून सांगितलें. परंतु वजीर होण्याचे प्याद्यांनीं वजीर तर जिवंत होतोच परंतु त्यांनीं उंटही जिवंत होतात, उंट होण्याचे प्याद्यानें उंट तर होतातच परंतु त्यांनीं वजीर व घोडीं जिवंत होतात, घोड्याचे प्याद्यानें घोडीं तर होतातच

परंतु त्यांचीं उंट व हत्तीही होतात व हत्ती होणारे प्याद्यानें हत्ती तर होतातच परंतु त्यांचीं घोडींही होतात.

ज्या मोहऱ्यापुढचें प्यादें मोहरें होण्यास सात घरें पुढें गेलें त्यानें तेंच मोहरें जिवंत व्हावें तें न होतां वजिराचा उंट, उंटाचा वजीर अगर घोडा, घोड्याचा उंट अगर हत्ती आणि हत्तीचा घोडा होतो. याचें कारण काय असें जर कोणी विचारील तर त्याचें कारण इतकेंच आहे कीं, प्याद्यांच्या दोन गती सांगितल्या आहेत. एक, एकच घर नीट समोर पुढें जाणें, व एक, एकच घर तिर्पें मारणें; मग तें उजवे-कडे असो अथवा डावीकडे असो. या दोन गतींच्या संबंधानें प्या-द्यांचीं उलट सुलट मोहरीं होतात, ह्मणजे वजिराचीं प्यादीं नीट समोर सातव्या घरांत गेलीं कीं त्यांचा वजीर होतोच, परंतु त्या प्याद्यांचें तिर्पें मारण्याच्या गतीनें उंट होतात, तसेंच उंटाच्या प्याद्यांनीं तिर्पें मारण्याच्या गतीनें वजीर व घोडीं होतात व घोड्यांच्या प्याद्यांनीं उंट व हत्ती होतात व हत्तीच्या प्याद्यांनीं घोडीं होतात.

राजे, वजीर, उंट, घोडे व हत्ती यांचे पुढचीं प्यादीं सहावे घरीं गेलीं असतां त्या प्याद्यांचीं अनुक्रमानें त्यांच्या गतीच्या नियमाप्र-माणें सातवे घरीं होणारीं मोहरीं होतात खरीं, परंतु असा कायमचा नियम नाहीं कीं, त्यांच्याच पुढचीं प्यादीं सहावे घरीं गेलीं पाहिजेत, कोणतेंही प्यादें सहावे घरीं गेलें कीं पुरे. त्यांचा सातवे घरीं होणारा मोहरा होईल, मग तें घर समोर पुढचें असो अथवा तिर्पें असो, ह्म-णजे प्याद्यांच्या गतीच्या संबंधानें पाहिजे त्या प्याद्याचा पाहिजे तो मोहरा होऊं शकेल. हत्तीच्या प्याद्यांचा वजीर, उंट व वजिरांच्या प्याद्यांचा हत्ती घोडें इत्यादि.

मागें सांगितल्याप्रमाणें कोणतींही प्यादीं सहावे घरीं गेल्यावर त्यांचीं सातवे घरीं होणारीं मोहरीं जिवंत होण्याबरोबर घोडा खेरीज करून, जागचेजागींच बसतात. घोडा मात्र जिवंत होण्याबरोबर जागचेजागीं बसत नाहीं. तो एकदम अडीच घरें उडाला पाहिजे.

मोहरें होणारें घरावर मारा असला तरी जोरांत मोहरा होण्यास कांहीं हरकत नाहीं. एवढेंच कीं घोडा होणारे घरावर मारा असेल तर मात्र तो होण्याबरोबर न उडतां जागचेजागींच बसेल.

मोहरा होणारे घरावर राजा खेरीज दुसरे कोणत्याही मोहऱ्याचा मारा नसेल तर तें मोहरें जिवंत होण्याबरोबर त्यास राजा मारील.

मोहरें होणाऱ्या घरावर राजाचा मारा असल्या कारणानें तो जर होत नाहीं तर त्या मारा असलेल्या घरावर कोणताही जोर करावा. जोरांत होणाऱ्या मोहऱ्यांच्या घरावर जरी राजाचा मारा आहे तरी तो त्यास मारूं शकत नाहीं.

घोडा होणाऱ्या घरावर राजाचा मारा आहे तर तो त्यास उडूं न देतां जागचेजागींच मारील.

जोरांत होणाऱ्या घोड्याच्या घरावर जरी राजाचा मारा आहे तरी होण्याबरोबर तो एकदम अडीच घरें उडेल.

घोड्याचा प्यादा सहावे घरीं असून सातवे घरीं त्याचा घोडा होऊन मारा नसेल तर तो ज्या घरांत अडीच घरें उडणार त्या घरांत जर उलट रंगाचा राजा असेल तर तो लागलींच शहाखेरीज दुसरा कोणताही डाव न खेळतां अन्य घरीं खेळला पाहिजे, अगर घोडा होणाऱ्या घरावर मारा तरी केला पाहिजे. या दोनही डावांखेरीज कोणताही तिसरा डाव खेळतां येत नाहीं.

घोडा होणारे घरावर मारा आहे परंतु घोडा काटशहानें होतो आहे तर तो मारवत नाहीं ह्मणून अडीच घरें उडाला पाहिजे असें कित्येकांचें ह्मणणे आहे. कित्येक ह्मणतात कीं, घोड्याच्या घरावर मारा आहे सबब तो उडूं नये काटशह आला ह्मणून तो मारवत नाहीं, जागचे जागींच बसेल.

घोडा होण्याबरोबर उडाला पाहिजे व उडूं नये ही गोष्ट फक्त काटशहाच्या संबंधानें येते व फायदेशीर झाल्यास उलट सुलट बोलणी फिरतात. ह्मणजे एकादे वेळेस घोडा उडाला पाहिजे व एकादे वेळेस उडूं नये असेंही ह्मणतात ह्मणून ही मोठी वादग्रस्त गोष्ट आहे सबब आमचें मत आहे कीं ज्या अर्थीं घोड्याच्या घरावर मारा असतांही मारण्याची शक्ति काटशहानें कुंठित झाली त्या अर्थीं, इरेस असलेल्या मोहऱ्याचा मारा आहे तरी त्याच्यानें जसें मारवत नाहीं, तसा असलेला मारा काटशहानें रद्द झाला, सबब घोडा होण्याबरोबर उडाला पाहिजे.

एवढ्यानें समाधान होत नसेल तर पूर्वीं ठराव करून खेळावें ह्मणजे आयते वेळेस भानगड न पडतां व वादविवाद न होता डाव शेवटास जाईल.

उभयतांचा खेळ सुरू झाल्यापासून पाळी पाळीनें दोघेही आपआपलीं मोहरीं व प्यादीं, आपआपले मोहऱ्यास व प्याद्यास जोर करून, मोहरें अथवा प्यादा मारून, शह देऊन, शह धरून, इरेस घालून, इरेस धरून, मारा ठेवून, आणि एर्‍हींच खेळतात. असें खेळतां खेळतां डाव जमणें, भांडणाचें तोंड उत्पन्न होणें, खिट्ट्या

बसणें, डाव विचकणें, डाव फुटणें, डाव फोडणें, डाव बचावणें, मोहरीं जिवंत होणें इत्यादि गोष्टी होवोत अगर न होवोत, किंवा दुसऱ्या कोणत्याही तऱ्हा असोत. कोणाचाही डाव चढा असो अगर ज़वळ जवळ सारखा असो, जोंपर्यंत डावाचा निकाल समजत नाहीं तोंपर्यंत एकंदर डावाची जी मध्यास्थिति तिला डावाचें मोघम स्वरूप ह्मणतात.

एकाचा डाव जबर असून दुसऱ्याचा डाव थोडा जेर आहे तरी डावाला जसें स्वरूप यावें तसें अद्याप स्वरूप आलें नाहीं असें ह्मणतात.

जबर डाव एकादे वेळेस जेरीस येतो व जेरीस आलेला डाव जबर होतो, असें होतां होतां डावाची बरोबरी बुर्जी, मात, प्यादी वगैरे-पैकीं कोणता तरी डाव होईल असें समजलें ह्मणजे डावाचें मोघम स्वरूप जातें.

डाव निकालास लागला ह्मणजे माजणें गलगुटावन व शहशह या गोष्टी होतात.

डावाचे मध्य स्थितीचा आणखी एक प्रकार आहे तो असा कीं, डावाचा निकाल ह्मणजे बरोबरी, बुर्जी, मात आणि प्यादी त्यां-पैकीं बरोबरी कोणत्याही तऱ्हेनें झाली कीं डाव संपतो ह्मणून बरोबरी मध्यस्थितींत येत नाहीं. प्रयत्नानें बुर्जीचा डाव झाला कीं डाव संपतो अशा तऱ्हेची बुर्जी मध्यस्थितींत येत नाहीं. परंतु स्वाभाविक डाव बुर्जी होण्याचा आला आणि तो पुढें चालविण्याचा चांगला संभव आहे ह्मणजे बुर्जीची मात (बुर्जी सोडून मात करणें) अथवा प्यादी हो-

ईल तर अशा तऱ्हेची बुर्जी डावाचे मध्यस्थितींत जाते त्याप्रमाणेंच मात झाली असतां प्यादी होईल असें समजून मात सोडून प्यादीचा डाव करण्याचा घाट घालतात अशा वेळेस डावाचा निकाल जी मात तीही डावाचे मध्यस्थितींत जाते.

बुर्जी व मात डावाचे मध्य स्थितींत जाऊन पुढें त्याची प्यादी होणार व डाव संपणार परंतु कोठें कोठें व कधीं कधीं प्यादीचाही डाव मध्यस्थितींतच येतो, तो असा कीं हुत्त्मल्ली व घोडमल्ली या प्याद्या कोणी कोणी फार श्रेष्ठ मानल्या आहेत व कोणी कोणी नुसती प्यादी कबूल करतात, परंतु या दोन प्याद्या कबूल करीत नाहींत ह्मणून ते दोन डाव होण्याचें साधन असेल तर प्यादी सोडून ते डाव करण्याचा प्रयत्न करतात, अशा वेळेस प्यादी ही डावाचें मध्यस्थितींतच येते.

ज्या डावाची बुर्जी, मात अगर प्यादी होणार नाहीं त्या डावाची प्रयत्नानें बुर्जी, मात व प्यादी झाली तर असे डाव पुढें चालवीत नाहींत. परंतु बुर्जीचीं मात व मातेची प्यादी होण्याची डावाची स्वाभाविक स्थीति आली तर मात्र डाव पुढें चालवितात अशा रितीनें पुढें चालविलेले डावाचे इष्ट डाव होतील असा नियम नाहीं, कदाचित् होतील अगर होणारही नाहींत किंबहुना उलटही होऊं शकेल.

बुर्जी,मात व प्यादी आपणावर होण्याचा संभव आहे अगर खचित होणार असें एका खेळणारांस समजलें कीं, तो आपलीं लहान मोहरीं लवकर माजवितो, दुसरा मोठा डाव व्हावा ह्मणून माजलेलीं मोहरीं मारीत नाहीं, असें केल्यानें वेळेनुसार आडला जाऊन उलट डाव खातो किंवा बरोबरी होते.

याप्रमाणें डावाच्या मध्यस्थितीचे पुष्कळ प्रकार आहेत ते खेळणारास आपोआप समजतील, व समजूं लागतील.

---

## प्रकरण ९.

### खेळण्याचे साधारण नियम.

मागें सांगितलेले बुर्जी वगैरे डाव कसे करावेत व कसे होऊं देऊं नयेत, या बद्दल खेळणारानें खेळते वेळीं लक्षांत ठेवण्याजोगे साधारण नियम.

नियम म्हटलें ह्मणजे पुष्कळच आहेत, त्यांतील साधारण सांगितले असतां बाकीचे किरकोळ नियम, खेळतां खेळतां खेळणाराचे ध्यानांत सहज येतील.

१ एका प्याद्याचा जोर दोन प्याद्यांस ठेवूं नये.
२ एका प्याद्याचा जोर दोन मोहऱ्यांस ठेवूं नये.
३ प्याद्याच्या जोरांत मोहऱ्यावर प्यादा येऊं देऊं नये.
४ प्याद्याच्या जोरांत प्यादा दोन मोहऱ्यावर येऊं देऊं नये.
५ प्यादीं विसखळीत होतील असें खेळूं नये.
६ विसखळीत झालेलीं प्यादीं चांगल्या रीतीनें जमतील असें खेळावें.
७ राजाच्या व वजिराच्या प्याद्यांस फार जपावें.
८ मोहरीं निघण्याकरतां पहिल्यानें प्यादीं खेळावींत.
९ एक दोन हातानें मोहरा जिवंत करणारा प्यादा मारण्यास

साधन नाहीं तर त्याचा जिवंत होणारा मोहरा सहसा मारूं नये.

१० मोहरा निवण्याबरोबर अथवा असेल तेथें त्यावर प्यादा जात असेल तर तो देऊन त्यांस मागें हटवावा,

११ प्यादा दिल्यानें मोहरा अंगावर येत असेल तर मात्र त्यावर तो देऊं नये:—

१२ तीन चार प्यादीं जर नळांडींत आहेत, तर पहिल्या प्याद्यास जोर ठेवावा, ह्मणजे नुकसान नाहीं.

१३ कोणतेंही प्यादें बिनजोरी असूं देऊं नये.

१४ सगळीं मोहरीं एकमेकांच्या जोरांत ठेवावींत.

१५ एखाद्या मोहऱ्यावर दुजोरा वगैरे जोर झाल्यास तितके जोर करावेत.

१६ मोहऱ्यावर दुजोरा वगैरे जोर झाल्यास तितके जोर होत नाहींत तर तो मोहरा माऱ्यांतून काढावा.

१७ मोहऱ्यानें मोहरें मारून जोर तोडावेत.

१८ शह येऊं न देण्यास फार जपावें.

१९ शह येऊन मोहरा जातो कीं काय हें पहावें.

२० पोकळ शह देऊं नये.

२१ शह आणि काटशह न येईल असें खेळावें.

२२ शह आणि काटशह येत असतील तर त्यांतून राजा काढावा.

२३ शह आणि काटशह ह्यानें मोहरा मरेल असा ठेवूं नये.

२४ शह आल्यास राजास घर ठेवीत जावें.

२५ शह आल्यास राजास घर नाहीं, तर मोहरा अथवा प्यादा इरेस आणण्याची तजवीज ठेवावी.

२६ नुसता शह येऊनच मात होते तर तो धरावा.

२७ मोहऱ्याचे तीन चार घरीं शह येतात, पैकीं कोणता शह नुकसान करणारा आहे हें पहावें.

२८ शह शह होऊं देऊं नयेत.

२९ शह आल्यास मोहरा अथवा प्यादा सहसा इरेस घालूं नये.

३० मोहरा अथवा प्यादा इरेस घातला तर त्यावर दुजोरा वगैरे होऊं देऊं नये.

३१ मोहरा इरेस घातला अगर सांपडला तर त्यावर प्यादा येऊं देऊं नये.

३२ वजीर अथवा हत्ती इरेस येतील असें खेळूं नये.

३३ इरेस सांपडलेला मोहरा खुला करण्याची तजवीज ठेवावी.

३४ इरेस सांपडलेल्या मोठ्या मोहऱ्यावर प्यादा आला तर तो लहान मोहऱ्यानें मरत असल्यास मारावा आणि मोठा मोहरा जगवावा.

३५ शहानें मोहरा जातो परंतु दुसरा मोहरा इरेस आल्यानें तो जगतो तर जोर करणारा मोहरा इरेस घालावा.

३६ इरेस असलेल्या मोहऱ्यावर जितके मारे असतील तितकेच जोर आहेत, पण फुकट मोहरा देऊन जोर तुटतो व फायदा होतो तर तो जोर असलेल्या मोहऱ्याचे माऱ्यांत खुशाल फुकट द्यावा.

३७ इरेस असलेल्या मोहऱ्यास जोर ठेवणाऱ्या मोहऱ्याचे माऱ्यां-

त, जोर तुटण्या करतां दिलेला फुकट मोहरा विचार केल्यावांचून घेऊं नये.

३८ पेचानें मोहरा अथवा प्यादा दिला असेल तो विचार केल्यावांचून घेऊं नये.

३९ मोहरीं अशीं खेळावी कीं, तीं पुढें गेलीं असतां मागें न हटतील:—

४० प्रत्येक डाव खेळण्यांत हेतु असावा, व रग असावी.

४१ लहान मोहऱ्यानें मोठें मोहरें न जाईल असें खेळावें.

४२ ज्या मोहऱ्यावर मारा आहे त्या मोहऱ्याच्या जोरांत मोहरा सारख्या मोहऱ्यावर देऊं नये.

४३ मोहऱ्यावर प्यादा येऊन लगेच तो दुसरे मोहऱ्यावर येतो, कीं काय हें पहावें.

४४ राजाचे माऱ्यांत जरी प्यादीं आहेत, तरी त्यानें तीं घेऊं नयेत, कदाचित् असें होतें कीं, तींच प्यादीं त्याचें रक्षण करतात.

४५ राजा अडीच घरें गेल्यावर कोपऱ्याच्या घरांत असतां घोड्याच्या प्याद्याच्या जोरांतला हत्तीच्या प्याद्यावर मोहऱ्याचा मारा आहे तर तें मोहरें मारण्याचा अथवा मागें हटविण्याचा प्रयत्न करावा.

४६ त्याच प्याद्यावर एका मोहऱ्याचा मारा असून हत्ती व वजीर यांचे मारे झाले तर मोहरा फुकट, देऊन डाव फोडण्याचा

अगर होण्याचा संभव आहे ह्मणून हत्तीचा प्यादा जरी प्याद्याच्या जोरांत आहे तरी आणखी जोर ठेवावेत.

४७ राजाचे जोरांत मोहरें अथवा प्यादें असेल त्यावर दुजोरा होऊन मात होते कीं काय हें पहावें.

४८ दुजोरा होऊन मात होते तर ती धरावी ह्मणजे आपले मोहऱ्याचा जोर करावा.

४९ राजाच्या संरक्षणार्थ, जीं प्यादीं अथवा मोहरीं आहेत, तीं इरेस आहेत कीं काय हें पहावें.

५० तीं इरेस असतील तर त्यांना इरेंतून काढण्याची तजवीज करावी.

५१ राजापासून मोहरीं फार लांब ठेवूं नयेत.

५२ राजा कोंपऱ्याच्या घरांत असतां जरूरच पडेल तेव्हां त्याचे जवळचीं प्यादीं पुढें सारावींत, आलाहिदा क्षुल्लक कारणाकरता तीं पुढें सरकवून त्यास उघडा करूं नये.

५३ राजाचा अडीच घरें जाण्याचा हक्क सहसा बुडवूं नये.

५४ शह न येईल, डाव लवकर न फुटेल, व उचल होणार नाहीं अशा बाजूला राजा अडीच घरें जावा फाटक्यांत जाऊं नये.

५५ राजा अडीच घरें गेल्यावर लगेच दुसरे राजावर चाल करण्याचा घाट घालावा.

५६ चाल करून आलेलीं मोहरीं राजाजवळ फार वेळ ठरूं देऊं नयेत.

५७ राजाकडच्या बाजूला चाल करून डाव फोडण्यास प्यादीं आलीं तर मारामारी न कारितां खिट्टी घालावी, राजा बचावून निघतो तर मारामारी करावी.

५८ एकाच मोहऱ्यानें राजावर चाल होऊन हल्ला होत नाहीं ह्मणून पूर्ती मोहरीं जमविल्यावांचून हल्ला करूं नये.

५९ एकाच बाजूला दोघांचे राजे गेले तर डाव फोडण्याकरितां राजाजवळचीं प्यादीं सरकवून त्यास कोणीही उघडा करूं नये, मोहरीं लागू करावींत.

६० वजिरावर कोणताही मोहरा अथवा प्यादा आला असतां त्यास सुरक्षीत घर आहे कीं नाहीं हें पहावें.

६१ वजिरावर कोणताही मोहरा अथवा प्यादा आला असतां निघण्यास घर नसेल तर घर करावें, घर होत नसल्यास मारा ठेवून वजिरावर तो येऊं देऊं नये.

६२ वजीर ढुर्कांत जाईल असें खेळूं नये.

६३ वजीर इरेस सांपडतो अगर येतो कीं काय हें पहावें.

६४ डावांत वजीर शिरून बद्धक होणार तर त्यावर वजीर देऊन आजिबात घालवावा.

६५ ज्या मोहऱ्याचे जोरांत वजिरावर वजीर देणें आहे तो शहानें अगर कसाही मारला जाऊन वजिराचा जोर नाहींसा होतो कीं काय हें पहावें.

६६ हत्तीला हत्ती जोडले असून एकावर मारा आहे तर प्या-

द्याच्या जोरांत लहान मोहरा प्याद्याखालीं जोडलेले हत्तीं-
मध्यें टाकावा.

६७ असा टाकलेल्या मोहऱ्यानें हत्तीचा जोर तुटतो पण मरणारे
हत्तीच्या माऱ्यांत मोहरा नसावा व त्याचा शहही नसावा.

६८ एकादा प्यादा मोहरा जिवंत होण्यास तयार आहे पण त्या-
चा होणारा मोहरा कायम आहे अशा भरंवशावर कोणताही
मोहरा त्या प्याद्याखालीं ठेवूं नये.

६९ कदाचित त्या प्याद्याखालीं मोहरा ठेविला असेल तर त्याच
जिवंत होणाऱ्या मोहऱ्याचे माऱ्यांत कांहीं एक ठेवूं नये.

७० प्रत्येक हातास कोणता मोहरा किंवा प्यादा कोठें येतो व
जातो हें पहावें.

७१ प्रत्येक हातास कोणत्या मोहऱ्याचा व प्याद्याचा शह येतो
व बसतो हें पहावें.

७२ प्रत्येक हातास कोणत्या मोहऱ्यास व प्याद्यास जोर आहे
कीं नाहींत हें पाहून कोणता मोहरा मरतो किंवा मारतो
पहावें.

७३ प्रत्येक हातास कोणता मोहरा अथवा प्यादा इरेस सांपड-
तो व इरेंत धरतो हें पहावें.

७४ बुर्जी, मात, प्यादी वगैरे डाव करण्यास व न होऊं देण्या
जपत जावें.

७५ कुर्जीचा डाव न होऊं देण्यास फार जपावें.

# प्रकरण १०.

## बुद्धिबलें खेळण्याचे प्रकार.

बुद्धिबलें खेळण्याचे प्रकार दोन आहेत, एक बळी किंवा जोराजोरी, व एक निर्बळी अथवा मारामारी.

### बळी खेळ.

बळी खेळांत मोहऱ्यांस व प्याद्यांस एकमेकाचा जोर राहील अशीं तीं खेळतात. कोणतेंही मोहरें अथवा प्यादें बिनजोरी असावयाचें नाहीं. उभयतां खेळणारांचीं मोहरीं व प्यादीं जोंपर्यंत जोरांत आहेत तोंपर्यंत तीं एकमेकांनीं मारतां येत नाहींत. जें मोहरें किंवा प्यादें बिनजोरी असेल किंवा होईल तें मात्र या खेळांत मरेल.

असा जोराजोरीचा खेळ चालला असतां मोठीं मोहरीं लहान मोहऱ्यांखालीं सांपडतात, तसेंच वजीर आदिकरून मोहरीं प्याद्याखालीं येतात. व पुढें पुढें घरें आडलीं गेलीं ह्मणजे तीं तशींच प्याद्याखालीं राहतात.

अशीं आडलेलीं मोहरीं किंवा प्यादीं अगर कोणतेंही मोहरें अथवा प्यादें काटशहानें मारावें असा या खेळांत प्रघात आहे.

काटशहानें कोणताही मोहरा अथवा प्यादा मरूं नये ह्मणून उभयतां खेळणार जिकडे तिकडे जोराजोरी ठेवून राजा अडीच घरें जाऊन शह काटशह न येतील अशा घरीं तो नेतात. शह काटशह येऊन मोहरीं व प्यादीं मरणार अशीं एकाचीं मोहरीं दुसऱ्या-

च्या डावांत शिरलीं कीं दुसरा त्यांचा बंदोबस्त करून कांहींएक न खेळतां राजाच खेळत बसतो.

एकाचा डाव चढाई करून आला व दुसऱ्याच्या डावाचा शह काटशहाचा पक्का बंदोबस्त असून दर डावास राजाच खेळतो असें जर आहे तर कधींही डाव संपणार नाहीं. ह्मणून सांप्रतकाळीं या चालीचा खेळ खेळणाऱ्या लोकांनीं असा नियम केला आहे कीं शहावांचून राजा हालूं नये.

शहावांचून राजा हालावयाचा नाहीं तर राजाचीं अडीच घरें उडणें साहजीक बंद होतें असें दिसतें पण कितीएक ठिकाणीं शह-लागण्यापूर्वीं तो एकदां अडीच घरें जातो, नंतर शहावांचून हालत नाहीं. राजा अडीच घरें जातो, तो एरवीच जातो. पण कोणी असें ह्मणतात कीं, या चालीच्या खेळांत तो अडीच घरानेंही मारतो. अडीच घरानें मारतो हें प्रशस्त नाहीं.

शहावांचून राजा हालावयाचा नाहीं ह्मणून असे शह देतात कीं, नाशह करतां करतां त्यानें काटशहांत यावें आणि काटशहानें मोहरीं वगैरे मारून टाकून शेवटीं तो व एखादें मोहरें ठेवतात.

या चालीच्या खेळांत शेवटीं एकच राहिलेला मोहरा माजून जोरी बिनजोरी जें सांपडलें तें मारीत सुटतो.

या चालीच्या खेळांत प्यादीवांचून कोणताही डाव नाहीं, प्यादी झाली पाहिजे, ती नच होईल तर मात्र मात करतात.

प्यादी होते वेळेस एकच मोठा राहिलेला मोहरा माजलेला असून तो प्यादी होऊं देणार नाहीं, ह्मणून प्यादीच्या वेळेस दोन तीन

किरकोळ मोहरीं ठेवतात. दोन मोहरीं असलीं ह्मणजे माज करितां येत नाहीं.

दोन तीन मोहरीं राहिलीं असतां माज करितां येत नाहीं खरा, पण प्यादीं किंवा मात होते वेळेस त्यापैकीं कोणत्याही मोहऱ्याचा मारा असल्यास माज करील.

प्यादी होते वेळेस प्याद्यावरचा मारा चुकविला पाहिजे.

या चालीचा खेळ फार थोडे लोक खेळतात.

## निर्बळी खेळ.

निर्बळी खेळ ह्मणजे उभयतां खेळणाराचीं मोहरीं व प्यादीं जोरांत असोत अथवा नसोत तीं एकमेकांनीं मारून मागे सांगितलेल्या डावापैकीं कोणता तरी डाव करणें या चालीच्या खेळांत कोणतेंही मोहरें प्याद्याखालीं रहाणार नाहीं व मोठा मोहरा लहान मोहऱ्याखालीं रहाणार नाहीं, काटशहानेंच मोहरीं व प्यादीं मारावींत असा या खेळांत निर्बंध नाहीं पाहिजे त्या रीतीनें तीं मारावींत, राजाच खेळत बसला तरीही चालतो, प्रत्येक हातास राजा खेळूं नये, अशी अटक नाहीं, या खेळांत कोणताही डाव केला किंवा झाला तरी चालतो. याप्रमाणें बुद्धिबळें खेळण्याचे दोन प्रकारांचें थोडक्यांत वर्णन दिलें आहे.

बळी खेळ मर्यादीत असल्या कारणानें त्याचें सविस्तर वर्णन न करितां निर्बळी खेळाची माहिती या ग्रंथांत दिली आहे. निर्बळी खेळ चांगला येऊं लागला कीं, बळी खेळ सहज खेळतां येईल.

निरबळी ह्मणजे मारामारीचा खेळ, बहूत करून सर्व देशांत चालतो, एवढेंच कीं, खेळण्याची रीत मात्र थोडथोडी निरानिराळी असते. ऐकिवांत व पाहण्यांत असें आहे कीं, पारसी व मुसलमान लोकांत बुद्धिबळें खेळण्याची रीत बहूतकरून आपल्या सारखीच आहे बुर्जी, मात, प्यादी, वगैरे डाव त्यांच्यांतही आहेत. येवढेच कीं, आपण बुद्धिबळें ह्मणतो, व तें सतरंज ह्मणतात. युरोपियन लोकही आपल्या प्रमाणेंच निरबेळी खेळ खेळतात, त्यांची रीत थोडीशी भिन्न आहे. ती समजावी ह्मणून आलाहिदा दिली आहे. प्रकरण नंबर १६ पहाः––

---

# प्रकरण ११.

## पाळीपाळीनें डावाचें वर्णन.

पाळीपाळीनें डाव ह्मणजे डाव सुरू होऊन शेवट होईपर्यंत प्रत्येक खेळणाराची पाळीपाळीनें प्रत्येक चाल किंवा हात, डावास आरंभ होऊन शेवट होईपर्यंत किती डाव होतील यांचा कांहीं नियम नाहीं. प्रत्येक डावांत दाहा पासून हावी ती संख्या शंभर दोनशें पर्यंत व्या तितके डाव होतील.

हे प्रत्येक डाव दोन जातीचे असतात.एक चांगले डाव व एक वाईट डाव. चांगले डावास खरे डाव ह्मणतात. वाईट डावास खोटे डाव ह्मणतात. खरे डाव पडले ह्मणजे त्यास नेमके हिशेबी वगैरे डाव ह्म-

णतात. खोटे डाव पडले ह्मणजे चुकीचे डाव अथवा चूक, चुकले व-गैरे ह्मणतात.

नेमके हिशेबी डाव ह्मणजे मोहऱ्याचा शह दोन ठिकाणीं लागतो, पण एक उगीच पोकळ लागतो व दुसरा दिला असतां मोहरा मिळून राजा कबज्यांत येतो तर दुसरा शह देणें नेमका डाव. एका मोहऱ्याच्या शहानें मात होते पण मध्यें मोहरें आडवें आहे तर तें कोठें तरी फुकट देऊन त्या मोहऱ्याच्या शहानें मात होणार ह्मणून जो सगळे डाव सोडून मात होणारे मोहऱ्याचा शह धरतो तो नेमका डाव होतो. प्याद्याखालीं वजीर मिळतो पण दुसऱ्या मोहऱ्याच्या शहानें एक दोन हातास खचीत मात होणार असें आहे, तर वजीर सोडून तो डाव खेळणें यांस हिशेबी डाव ह्मणतात. लहान मोठें मिळतें, परंतु लागू मोहरा जातो, ह्मणून लहान मोठें सोडतात हा हिशोबी डाव होतो असे नेमके हिशेबी, खरे डाव डावांत पुष्कळ येतात. ते समजले मात्र पाहिजेत.

खोटे ह्मणजे चुकीचे डाव यांतही दोन तऱ्हा आहेत, एक मोठी चूक, व एक क्षुल्लक चूक, मोठी चूक म्हणजे दुर्कांत अगर कसाही वजीर, आदिकरून मोहरा, जातो, तो न दिसणें, मात होत असतां ती न दिसणें आणि भलतेंच खेळणें अशा डावास मोठी चूक ह्मणतात, डाव दिला असतां प्रथम खेळणारांस मी बरा खेळलों असें वाटलें. नंतर दुसऱ्या खेळणाराच्या डावानें आपलें नुकसान ह्मणजे आपला डाव खोटा पडला हें समजणें ही क्षुल्लक चूक, असे चुकीचे डाव प्रत्येक चालू डावांत हमेषा असतात, एवढेंच कीं, मोठ्या चुका

सहज ध्यानांत येतात, आणि क्षुल्लक चुका ध्यानांत येत नाहींत, त्या तशाच दडपल्या जातात.

खरे खोटे डावाचें वर्णन करण्याचें फारसें जरूर दिसत नाहीं. खेळणारानें आपलेकडून जितके होईल तितक्या विचारानें खरे डाव खेळावेत.

खेळण्याची पाळी आली असतां डाव देणें तो चांगला विचार करून द्यावा, कारण एकदां खेळण्याची पाळी संपली, आणि दुसऱ्याची पाळी येऊन तो डाव देण्याचा विचार करूं लागला ह्मणजे आपला डाव चुकीचा पडला असें जरी आपणांस कळलें तरी तो परत मिळणार नाहीं, खेळणारानें दिलेला डाव खोटा असो, अगर खरा असो, कधींही माघारा घेऊं नये.

---

# प्रकरण १२.

## अवश्य डाव खेळणें.

कोणतेंही मोहरें प्याद्यानें अथवा मोहऱ्यानें फुकट मरत आहे, आणि शह आला तर पहिल्यानें शह काढलाच पाहिजे, मोहरें फुकट मरतें ह्मणून आम्ही शह काढीत नाहीं. व मोहरें वांचवूं असें ह्मणणें चालणार नाहीं. शहाचा नाशह करणें हा अवश्य डाव खेळलाच पाहिजेः——

किरकोळ लहान मोहऱ्यांनीं मात होत आहे, परंतु मात होणारे

घरावर वजीर अथवा हत्ती यांचा मारा आहे, तर मात होते वेळेस ते मरावयास दिलेच पाहिजेत, कदाचित् ते मेले असतां प्यादीवर डाव जाईल. ह्मणून तुम्ही मातच करा, आम्ही वजीर व हत्ती यांनीं मारीत नाहीं, असें ह्मणणें चालणार नाहीं. त्यांनीं मारून मात जगाविणें अवश्य डाव आहे, त्याचा मारा नसता तर हें म्हणणें चाललें असतें:—

राजास हत्तीचा अगर उंटाचा शह येऊन मात होत आहे पण वजीर अथवा हत्ती इरेस येऊन ती जगते, इरेस घातलें असतां पुढें प्यादीवर डाव जातो असें समजून आह्मी इरेस घालीत नाहीं, पाहिजे असल्यास तुह्मी मातच करा असें ह्मणणें चालणार नाहीं. इरेस घालणें अवश्य डाव आहे.

एकाचा एकच प्यादा साहवे घरीं लहान किंवा मोठें मोहरें होण्यास गेला आहे आणि त्याचा एकच मोहरा, इरेस अथवा कोठेंही असो जर मारला गेला आणि राजास खेळण्यास जागा नाहीं तर ती बुर्जी न समजतां त्या प्याद्याचा मोहरा करणें अवश्य डाव आहे.

घोड्याचा प्यादा सहावे घरीं गेला असतां तो होणारे घरावर मारा नसला व होत नसल्यास सातवे घरापासून तो आडीच घरें उडण्याच्या कोणत्याही घरांत उलट रंगाचा राजा असेल तर शह देण्यावांचून तो दुसरे घरीं खेळणें आवश्य डाव आहे.

---

# प्रकरण १३.

## हुचमल्लीचा डाव कसा खेळावा.

हुचमल्ली हा प्याद्यापैकींच एक डाव आहे. ही होतांना एकाचा राजा उंट व एकच घोड्याचें प्यादें आणि दुसऱ्याचा राजा व बेपगी उंट अशीं राहतात, पण हीं जर डाव संपत आल्यावर अस्ताव्यस्त राहिलीं तर हुचमल्ली तर काय पण कोणताच डाव होणें नाहीं ह्मणून बरोबरी ह्मणून डाव टाकतात. अशा डावांत ज्याचा प्यादा आहे त्याचा वजीर व हत्ती आहे तर मग कायमची हुचमल्ली होईल.

इतर प्याद्या जशा साहजिक व अवचित होतात तशी हुचमल्ली होत नाहीं. ही होण्याचा मुद्दाम घाट घातला पाहिजे तो असा कीं, प्यादा जागचे जागींच आहे व तो उंट धरून बसला आहे पुढें सरकवूं देत नाहीं तर हत्ती व वजीर यांचे शह देऊन उंटास इरेस घेऊन अगर प्यादा सरकवला असतां त्यांस मारतां न येईल असा भलतीकडे नेऊन तो प्यादा त्याच घोड्याच्या सहावे घरीं न्यावा तसाच दुसऱ्याचा राजाही प्याद्याच्या बाजूस कोंपऱ्याचे घरांत न्यावा. व आपला राजाही प्याद्याचे बाजूचे उंटाचे सातवे घरीं ठेवावा. उंट असा ठेवावा कीं, प्यादा पुढें सरकण्याबरोबर हत्तीचे पट्टीचें सातवें घर धरील. इतकी व्यवस्था झाली ह्मणजे हुचमल्लीची तयारी झाली असें समजावें.

वर सांगितलेली व्यवस्था वजीर व हत्ती यांचे योगानें झाली. पण जोंपर्यंत ते डावांत जिवंत आहेत तोंपर्यंत प्यादी झाली तरी तीस हुचमल्ली ह्मणतां येत नाहीं ह्मणून ते अगर दुसरीं मोहरीं व प्यादीं डा-

वांतून अगदीं नाहींशीं कशीं करावींत याची माहिती पुढें दिली आहे. हुचमल्ली होतांना बाकी काय राहतें हें तर दिलेंच आहे, परंतु वजिर व हत्ती खेरीज कांहीं राहिल्यास ते राजानें व उंटानें फुकट मरायास द्यावेत न मारतील तर मारणें भाग पाडावें, प्यादीं मरत नसलीं तर त्यांचीं मोहरीं करून तीं मारवावींत. फक्त हुचमल्लीचा डाव आणि वजीर व हत्ती ठेवून बाकीचे सर्व नाहींसें झाल्यावर वर सांगितलेली व्यवस्था करावी.

हुचमल्लीची तयारी झाली ह्मणजे राहिलेले वजीर व हत्ती शहानें असे मरावयास द्यावेत कीं प्याद्यावरचा उंटाचा मारा नाहींसा होईल. उंटाचा मारा चुकला कीं प्याद्याचा शह देऊन हुचमल्ली करावी.

राहिलेले वजीर व हत्ती शहांत मरूं नयेत ह्मणून, नुसती प्यादी कबूल करून मारणारा उंट प्याद्यावरचा मारा सोडून भलतीकडे असा जातो कीं त्या दोन मोहऱ्यांस शहच देतां येऊं नयेत. परंतु वजीर असल्या कारणानें तो उंट कोठेंही गेला तरी त्यास तो विवक्षित घरांत बांधून आणतो आणि तेथून आपण शहानें मरतो, व तसाच हत्तीसही मारवितो. हत्ती असा ठेविला पाहिजे कीं वजीर शहानें मेला असतां लगेच हत्तीचा शह उंटाच्या माऱ्यांत बसला पाहिजे.

कायमची हुचमल्ली होण्यास मुख्य साधन म्हटलें ह्मणजे वजीरच होय. त्याच्या वांचून कितीही मोहरीं असलीं तरी कायमची हुचमल्ली होणार नाहीं. कारण मारणारा उंट एकदां कां आपले घरांत बसला आणि आपलें घर, घोड्याचें दुसरें घर आणि हत्तीचें तिसरें घर खेळूं लागला कीं त्याला इरेस आणून राहिलेलीं मोहरीं मरावयास देऊन

प्याद्यावरचा मारा काढणारा कोणताही मोहरा समर्थ नाहीं म्हणून वजिरावांचून कायमची हुचमल्ली होत नाहीं.

एकादे वेळेस वजिरावांचून मारणारा उंटाच्या पगचा उलट उंट अगर कांहीं असेल, आणि मारणारा उंट मागें सांगितलेल्या तीन घरांखेरीज अप्रयोजकपणानें भलतेच घरीं बसला असेल, तर मात्र हुचमल्ली होईल, परंतु अशी हुचमल्ली हामखासची ह्मणतां येत नाहीं. कारण ती न होण्यास साधनें होतीं तीं केलीं नाहींत म्हणून झाली असें म्हणतात. वजीर असतांना हें म्हणणें चालणार नाहीं. हामखासचीच हुचमल्ली झाली पाहिजे.

वजिरावांचून हामखासची हुचमल्ली होत नाहीं, आणि हुचमल्लीचा डाव आहे तर हा डाव कोणता होईल अशी शंका कोणी घेतील तर त्यास एवढेंच सांगणें पुरे कीं उंट इरेस धरून प्यादी मात होईल.

## घोडमल्लीचा डाव कसा करावा.

घोडमल्ली हा हुचमल्लीसारखाच एक प्यादींपैकीं डाव आहे. त्यांत दोन्ही खेळणाराचे राजे दोघांचीं दोन घोडीं व एकाचें कोणत्याही घोड्याचें एकच प्यादें असें राहून त्याच प्याद्याचा नेमके घरांत शह बसून प्यादी झाली कीं घोडमल्ली होते; पण असा डाव स्वाभाविक येण्यास फार कठिण आहे ह्मणून मुद्दाम तो तसा आणला पाहिजे. तसा डाव आणण्यास इतर कांहीं साधन असो अथवा नसो, परंतु ज्याचा प्यादा आहे त्याचे दोन हत्ती व वजीर अशीं तीन मोहरीं असलीं ह्मणजे त्यांचे योगानें घोडमल्लीचा घाट घालतां येतो तो असा

कीं, कोणत्याही घोड्याचा प्यादा जागचे जागींच आहे. दोन्ही राजे विवक्षित स्थळापासून फार लांब आहेत, आणि घोडमल्ली करणाराचा घोडाही तसाच आहे. त्यास, प्याद्यास व राजास उलट रंगाचा घोडा आडवितो आहे तर हत्ती व वजीर यांचे शह देऊन देऊन आडविणारा घोडा वरचेवर इरेस घेत घेत इतक्या लांबच्या घरांत इरेस ठेवावा कीं निदान तो एका हातानें प्याद्याचा शह धरण्यास, राजास शह देण्यास अगर घोडा मारण्यास न येईल.

याप्रमाणें लांबच्या घरांत घोडा इरेस सांपडल्यावर प्यादा घोड्याचे सहावे घरीं न्यावा. त्याच प्याद्याचे शेजारीं उंटाचे सहावे घरीं राजा ठेवावा व घोडा प्याद्याचे मागचे ह्मणजे घोड्याचे पांचवे घरांत ठेवावा. याप्रमाणें झाल्यावर घोडा इरेस न येईल अशा रीतीनें घोडमल्ली होणाऱ्या राजाला शह देत देत प्याद्याजवळच्या कोंपऱ्याच्या हत्तीच्या घरांत न्यावा. इतकी व्यवस्था झाली ह्मणजे घोडमल्लीची तयारी झाली असें समजावें.

घोडमल्लीची तयारी झाली ह्मणजे ती कोणती हें पुढें दिलें आहे.

प्यादा घोड्याचे साहावे घरीं राजा प्याद्याचे बाजूस उंटाचे साहवे घरीं, घोडा प्याद्याचे मागें पांचवें घरीं, हत्ती प्याद्याचे पुढचे घोड्याचे सातवे घरीं अगर त्याच घराचे आडवे पट्टींत कोणतेही घरीं, वजीर आपले राजाचे किंवा आपले सहावे घरीं, आणि दुसरा हत्ती घोडा इरेस धरलेला आपल्याच घरांत, घोडमल्ली होणारा राजा हत्तीचे घरांत आणि त्याचा घोडा वजिराच्या किंवा राजाच्या हत्तीच्या उभ्या पट्टींत सातवे घरीं. ( घोडमल्लीचा डाव पहा. )

आतां फक्त इरेस धरलेला घोडा हालूं न देतां वजीर व हत्ती मरायास देऊन प्याद्याचा शह दिला असतां घोडमल्ली कशी होते हें पुढें दिलें आहे.

घोड्याचे सातवे घरांतला हत्तीचा शह प्याद्याच्या जोरांत द्यावा-राजास आपले घोड्याचे घरीं जाणें भाग. त्याच हत्तीचा शह हत्तीच्या घरांत बिनजोरी दिला असतां राजास मारणें भाग. नंतर वजिराचा शह हत्तीच्या दुसरे घरांत, राजा आपले घोड्याचे दुसरे घरीं जातो. नंतर जसा हत्ती मरायास दिला तसाच वजीरही मरायास देऊन घोडा इरेस धरलेल्या हत्तीचा शह देऊन तोही मारवावा, तो मारण्यास राजा कोंपऱ्याचे घरांत जाण्याबरोबर दुसरा राजा उंटाचे सातवे घरांत सरकवावा. घोडा कांहींही खेळो, प्याद्याचा शह द्यावा. आणि घोडमल्ली करावी.

याप्रमाणें हामखासची घोडमल्ली कशी करावी हें सांगितलें. याशिवाय अन्य रीतीनें घोडमल्ली होणार नाहीं असें ह्मणणें नाहीं, होईलच, पण ती हमखास करूं म्हटलें तर होणार नाहीं.

हुचमल्लीमध्यें मरावयास द्यावयाचीं मोहरीं उंटांनेंच मारवलीं पाहिजेत आणि घोडमल्लींत राजानें मारवलीं पाहिजेत.

खेळतां खेळतां हुचमल्ली अथवा घोडमल्लीचा डाव आला आणि मी तो करणार असें खात्रीपूर्वक कोणी म्हटलें तर त्याला मागें सांगितलेलीं साधनें पाहिजेत, नाहीं तर होणें अशक्य आहे.

हुचमल्ली व घोडमल्ली होते वेळेस उंट व घोडा इरेस नसतात. गजमल्ली व फकेरी होते वेळेस हत्ती व वजीर इरेस असतात.

हामखासची गजमल्ली करूं म्हटलें तर ती होणार नाहीं असें दिसतें. साहजिक मात्र झाली तर होईल, पुढें एक डाव दिला आहे.

फकेरी मात्र एका प्रकारानें हामखासची होते त्या व्यतिरिक्त हामखास होणें फार अशक्य आहे. या प्रकारचा एक डाव पुढें दिला आहे.

---

# प्रकरण १४.

## डावाची परिभाषा.

| | | |
|---|---|---|
| रा. | ह्मणजे | राजा |
| व. | ,, | वजीर. |
| ह. | ,, | हत्ती. |
| घो. | ,, | घोडा. |
| उं. | ,, | उंट. |
| प. | ,, | प्यादा. |
| घ. | ,, | घरीं, घरचा. |

एका रंगाचा एक राजा व एक वजीर आहेत ह्मणून ते सहज समजतील, परंतु त्याच रंगाचे दोन हत्ती, दोन घोडे, दोन उंट, निरनिराळे समजावेत ह्मणून त्यांचे २ वर्ग केले आहेत.

### वर्ग १.

| | | |
|---|---|---|
| रा. ह. | ह्मणजे | राजाचा हत्ती. |

| | | |
|---|---|---|
| रा. घो. | ,, | राजाचा घोडा. |
| रा. उं. | ,, | राजाचा उंट. |

वर्ग २.

| | | |
|---|---|---|
| व. ह. | ह्मणजे | वजिराचा हत्ती. |
| व. घो. | ,, | वजिराचा घोडा. |
| व. उं. | ,, | वजिराचा उंट. |

हे दोन वर्ग दोन्ही रंगांच्या मोहऱ्यांस सारखे लागू आहेत.

प्रत्येक रंगाचीं आठ आठ प्यादीं प्रत्येक रंगाचे मोहऱ्यापुढें पुढचे आडवे पट्टींत असतात ह्मणून तीं सहज समजतात. दोन्ही रंगांचीं बुद्धिबळें सांगितल्याप्रमाणें मांडल्यानंतर खेळ सुरू झाला कीं तो संपेपर्यंत पाळीपाळीनें दोन्ही रंगांचीं मोहरीं व प्यादीं पटाच्या या घरांतून त्या घरांत जातात व येतात. मग तीं कशींही जावोत अथवा येवोत, तीं घरें समजण्याकरितां पुढें नियम दिला आहे तो लक्षांत ठेविला ह्मणजे कोणतें मोहरें किंवा प्यादें कोणत्या घरांत खेळावयाचें हें सहज ध्यानांत येईल.

प्रत्येक रंगाचें मोहरें अगर प्यादें कोणत्याही घरांत खेळलें असतां तें घर कोणत्याही उभ्या आठ पट्ट्यांपैकीं एका पट्टीचें कोणतें तरी घर असतें, म्हणून त्या उभ्या आठ पट्ट्या व त्यांचीं घरें पुढें सांगितलीं आहेत तीं ध्यानांत ठेवलीं ह्मणजे पुरे.

| | |
|---|---|
| १ उभी पट्टी, राजाची. | राजाचें घर, दुसरें घर, तिसरें घर, चौथें घर, पांचवें घर, सहावें घर, सातवें घर आणि आठवें घर. |

